*नेहरू बाल पुस्तकालय*

# रस्टीचे पराक्रम

## रस्किन बाँड

*अनुवाद*

**क.दि. सोनटक्के**

*चित्रे*

**सुधासत्व बसू**



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# अनुक्रमणिका

# आजीचे नामी स्वैपाकघर

इतर स्वैपाकघरांच्या मानाने आजीचे स्वैपाकघर तसे काही फार मोठे नव्हते. झोपण्याची खोली किंवा बैठकीच्या खोलीएवढेही ते नव्हते. पण ते पुरेसे मोठे होते. आणि त्याच्या शेजारीच कोठी होती. ते नामी वाटायचे ते तिथल्या एकाहून एक अफलातून पदार्थांमुळे. तोंडाला पाणी सुटणाऱ्या गोष्टी. कधी कबाब आणि रस्सा, चॉकलेटचे गोळे आणि शेंगदाण्याची चिक्की. मुरंबा आणि गुलाबजाम, मांस आणि सफरचंदाचे लुसलुशीत गोड पदार्थ, भरलेली टर्की, भरलेली कोंबडी किंवा भरलेली वांगी आणि भरलेल्या चिकनने भरलेले हॅम.

आख्ख्या जगात आजीचा स्वैपाकात हात धरू शकणारं कुणी नव्हतं.

आम्ही डेहराडूनमध्ये रहात असू. ते गाव अजूनही आहे. पण स्वातंत्र्य मिळाल्यापासून ते पुष्कळच पसरलंय. आणि त्याची वस्तीही पुष्कळ वाढलीय. आजींचे घर गावाच्या शिवेवर होते. एक अवाढव्य पसरलेला बंगला. सभोवतालच्या बागेत पुष्कळ फळझाडे होती. आंबा, लिची, पेरू, केळ, पपई, लिंबू आणि घराच्या भिंतींवर सावली पाडणारे फणसाचे भलेथोरले झाड. आणि या प्रत्येकाला सामावून घ्यायला तिथे बक्कळ जागा होती.

*पुराण वृक्षाची सहज सावली ज्याच्या भिंतींवरी*
*कृपादृष्टी असे देवाची अशा घरांवरी.*

आजीचे हे शब्द माझ्या चांगले लक्षात आहेत. ते खरोखरच खरे होते. ते घर राहायला अगदी मस्त होते, विशेषतः नऊ वर्षांच्या महाखादाड मुलाच्या दृष्टीतून.

आजी जगातली सर्वोत्कृष्ट स्वैपाकीण असली तर मी जगातला सर्वांत खादाड मुलगा असलो पाहिजे. आणि मी खरेच नशीबवान होतो कारण प्रत्येक मुलाला यक्षिणीप्रमाणे स्वैपाक करता येणारी आजी असतेच असे नाही. (म्हणजे यक्षिणी स्वैपाक करत असल्या तर.)

प्रत्येक हिवाळ्यात मी शाळेच्या वसतिगृहातून घरी परतत असे. त्यावेळी मी

आधी निदान एक महिनातरी आजीकडे जाऊन राहायचो. आणि त्यानंतर उरलेली सुटी आसाममध्ये असलेल्या माझ्या आई बाबांकडे. माझे बाबा तेथे एका चहाच्या मळ्यांचे व्यवस्थापक होते. चहाचे मळे म्हणजे खूपच मजा. पण माझ्या आईबाबांना स्वैपाक करता येत नसे. त्यांनी एक खानसामा ठेवला होता. त्याचा मटणाचा रस्सा चांगला व्हायचा पण बाकीच्या बाबतीत मात्र काही तरीच गोळाबेरीज असायची. दर रात्री जेवताना मटण-रस्सा म्हणजे जरा कंटाळा येणारीच बाब. नव नवीन पदार्थ खायची हौस असणाऱ्या मुलाच्या नजरेतून.

त्यामुळे निम्मी सुटी आजीकडे घालवायला मी एका पायावर तयार असायचो.

माझ्या येण्यामुळे तिलाही आनंद वाटायचा. कारण तशी ती एकटीच राहात होती. एकटी म्हणजे अगदीच एकटी नाही. कांता नावाचा माळी मागील पडवीत राहात असे. त्याला मोहन नावाचा माझ्याच वयाचा मुलगा होता. घरात सुझी नावाचे निळ्या चकाकत्या डोळ्यांचे सयामी मांजर होते. आणि एक गावठी कुत्रा होता. त्याचे नाव होते वेडपट. कारण तो घराभोवती गोलगोल चकरा मारत पळत रहायचा.

आणि अर्थात तेथे केनकाकाही असायचा. तो आजीचा पुतण्या होता. आणि नोकरी नसली की तो आजीकडे येऊन राहायचा आणि खूपदा त्याला नोकरी नसायचीच. शिवाय आजीच्या हातचं काही खावसं वाटलं की यायचाच ते वेगळेच.

तेव्हा खरे म्हटले तर आजी एकटी अशी नसायची. तरीही मी आलो की तिला आनंद व्हायचा. ती म्हणायची की मला फक्त स्वतः करता स्वैपाक करायला आवडत नाही. तो *कुणासाठी* म्हणून असायला हवा. त्यामुळे मांजर आणि कुत्रा आणि कधी कधी केनकाका तिच्या स्वयंपाकाची स्तुती करायला हजर असले तरी कुणाही पाककुशल माणसाला आपण केलेले पदार्थ खायला एखादा लहान मुलगा असायला हवा असतो, कारण लहान मुलगे धाडसी असतात आणि कोणतेही अफलातून पदार्थ खायला त्यांची कधीच ना नसते.

एखादा नवा पदार्थ खायला दिला की त्याबद्दल माझे मत काय आहे ते जाणून घ्यायला आजी उत्सुक असायची. माझ्याकडून प्रतिसाद मिळाला की त्याबद्दल एका वहीत लिहून ठेवायची. इतरांसाठी तो पदार्थ बनवताना ते टिपण उपयोगी पडायचे.

"आवडला?" त्या पदार्थाचे चार पाच घास खाल्ल्यावर ती विचारायची.

"हो, आजी."

"गोडीला चांगला आहे?"

"होय, आजी."

"का उगीच जास्तीच गोड झालाय?"

"नाही आजी."

"अजून वाढू? "
"होय आजी."
"मग तू हा सगळा संपवूनच टाक."
"अहाहा..."

भाजलेले बदक.
ते करावे ते आजीनेच.

आजीच्या घरी पहिल्यांदा भाजलेल्या बदकाची चव घेतली त्यावेळी तेथे केनकाकाही होता.

आगगाडीच्या गार्डची नोकरी त्याने नुकतीच गमावली होती. आणि दुसरी एखादी नोकरी पदरात पडेपर्यंत आजीकडे राहायचे म्हणून तो तेथे आला होता. तसे म्हणायचे तर जमेल तितका काळ तो आजीकडेच काढायचा. आणि सरतेशेवटी पाद्री दास यांच्या अॅकॅडेमीत लहान मुलांकडे लक्ष द्यायच्या, सहशिक्षकाची नोकरी करण्याबद्दल आजीने विषय काढला की तो तेथून आपला मुक्काम हलवायचा. केनकाकाला लहान मुले अवतीभोवती असणं सहन होत नसे. "त्यांच्यापुढं मला बिचकायला होतं", असे तो म्हणायचा. माझीसुद्धा त्याला तशी भीती वाटायचीच. पण मी एकटाच असायचो आणि तशी वेळ आलीच तर माझ्यापासून त्याचे रक्षण करायला आजी जवळच असायची. पण पाद्री दासांच्या संस्थेत तर शंभराहून अधिक मुले होती!

केनकाकाही खूप खादाड होता आणि तो माझ्या इतकेच चापून खायचा तरी आजीच्या पदार्थांची तो कधीच स्तुती मात्र करत नसे. मला वाटते की त्यामुळेच मी त्याच्यावर चिडायचो. आणि त्यामुळेच काही वेळा तरी त्याला तंतरवायला मला आवडायचे.

केनकाकाही भाजलेल्या बदकाकडे पाहात राहिला. आपला चष्मा घसरून नाकाच्या शेंड्यापर्यंत आला आहे हेही तो विसरून गेला.

"हं. पुन्हा बदकच, मेकाकी?"

"म्हणजे तुला काय म्हणायचंय? गेला महिनाभर तू इथं आहेस तेव्हापासून मी एकदाही बदक केलेले नाही"

"मीही तेच म्हणतोय," केनकाका म्हणाला. "का कोण जाणे मेकाकी, पण तुझ्या पदार्थांत विविधता असणारच अशी अपेक्षा असते."

तो हे म्हणाला खरे पण तरीही त्याने दोन वेळा भरपूर वाढून घेतले आणि माझ्या हाती लागण्यापूर्वीच आतला सगळा खिमा संपवून टाकला. त्याचा सूड

म्हणून मी सगळाच्या सगळा सफरचंदाचा पाक माझ्या ताटात ओतून घेतला. मला खिमा आवडतो हे केनकाकाला चांगले माहिती होते. आणि आजीचा सफरचंदाचा पाक मिळावा म्हणून तो अगदी वेडापिसा असतो हे मलाही चांगले माहिती होते. तेव्हा आता आम्हा दोघांची बरोबर फिट्टंफाट झाली होती.

तू तुझ्या आईवडलांकडं केव्हा जाणार आहेस ?'' मी तेथून लवकर निघून जावे या अपेक्षेने अंबूस मुरंबा वाढून घेत त्याने मला विचारले. ''यंदा मी बहुधा त्यांच्याकडं जाणारच नाही.'' मी म्हटले. ''तुम्हाला केव्हा दुसरी नोकरी लागणार आहे काका ?''

''आता दोन चार महिने तरी विश्रांती घ्यायचा माझा बेत आहे.''

आजी आणि आया यांना कामात मदत करायला मला आवडत असे. आम्ही ते काम करत असताना केनकाका व्हरांड्यात आरामात वामकुक्षी करायचा किंवा रेडिओ सुरू करून नृत्यसंगीत ऐकत बसायचा.

''आणि तुझा केनकाका तुला कितपत आवडतो ?'' त्याच्या पानातली हाडे कुत्र्याच्या थाळीत ओतत असताना एक दिवस आजीने मला विचारले.

''तो दुसऱ्या कोणाचातरी काका असता तर बरं झालं असतं असं मला वाटतं,'' मी म्हणालो.

''तो इतका काही वाईट नाही हं. जरा तऱ्हेवाईक आहे एवढंच.''

''तऱ्हेवाईक म्हणजे ?''

''म्हणजे थोडासा वेडपट.''

''वेडपट निदान घराभोवती पळत तरी असतो.'' मी म्हटले. ''केनकाकाला पळताना मी कधीच पाहिलं नाही.''

पण एक दिवस मला तो तसा दिसला.

मी आणि मोहन आमराईच्या सावलीत गोट्या खेळत असताना मला तो जीव घेऊन पळताना दिसला. त्याच्या पाठीमागे मधमाशांचा थवाच्या थवा लागला होता. तो सावरीखाली आरामात चिरूट ओढत बसला होता. आणि नेमके त्याच्या डोक्यावर माशांचे पोळे होते. चिरूटातून बाहेर पडणाऱ्या धुरामुळे माशा त्याच्यावर चिडल्या होत्या. केनकाका घाईघाईने घरात शिरला. त्याने एका झेपेत टीप गाठले. काही माशा त्याला डसल्या होत्या. आणि त्यामुळे तीन दिवस अंथरूणात पडून राहायचा निर्णय त्याने घेऊन टाकला. त्याचे जेवणाचे ताट घेऊन आया त्याच्या खोलीत जायची.

''केनकाकाला इतक्या वेगानं पळता येतं याची मला कल्पना नव्हती.'' मी नंतर म्हटले.

''भरपाई करायची निसर्गाची आपली पद्धत''. आजी मला म्हणाली.

''भरपाई म्हणजे ?''

''एक गोष्ट होत नसेल तर त्याऐवजी दुसरी देऊन ती उणीव भरून काढायची. आता केनकाकाला निदान कळलं तरी की आपल्याला *पळता येतं* म्हणून. हे छान झालं की नाही ?''



# आजीची लोणची

जेव्हाकेव्हा आजी व्हॅनिला किंवा चॉकलेट फजसारखे गोड पदार्थ तयार करायची तेव्हा तेव्हा त्यातला थोडा भाग माळ्याच्या मुला कडे-मोहनकडे पोचवायला ती मला सांगे.

त्याच्याकरता भाजलेले बदक किंवा कोंबडीचा रस्सा घेऊन जाण्यात काहीच अर्थ नव्हता. कारण त्याच्या घरातले सगळे लोक पक्के शाकाहारी होते. मोहनला गोड पदार्थ मात्र खूप आवडत— गुलाब जाम, रसगुल्ले, जिलेबी, वगैरे. भरपूर दूध, साखरेचे इथले पदार्थ किंवा आजीने घरी केलेली इंग्लिश मिठाई तर त्याच्या खास आवडीची होती.

फणसाच्या फांद्यांवर बसून आम्ही चिक्की, पेपरमिंट किंवा असेच काही गोड पदार्थ खात असू. फणस नुसता खायला मात्र आम्हाला आवडायचा नाही. त्याची तुरपुडी भाजी किंवा त्याचे लोणचे घातले तरच आम्हाला ते आवडायचे पण ते झाड मात्र चढायच्या दृष्टीने अगदी छान होते. आणि त्या झाडावर काही लोभसवाणे प्राणीही राहायचे. खारी, वटवाघळे, आणि हिरव्या पोपटांची एक जोडी. खारी लाघवी होत्या. आणि थोड्याच काळात त्या आमच्या हातून खायला शिकल्या. आजीचे चॉकलेट त्यांनाही आवडत असे. एक चिमुकली खार तर इतकी धीट होती की मी तिच्यापासून काही लपवून ठेवले तर नाही ना याची खात्री करून घ्यायला ती सरळ माझ्या खिशातूनही फेरफटका मारायची!

मी आणि मोहन बागेतल्या कोठल्याही झाडावर सहज चढू शकायचो. आजीला आम्ही हवे असलो की ती प्रथम पुढच्या व्हरांड्यातून आम्हाला हाक मारायची, मग घराच्या एका बाजूला असलेल्या कोठीतून आणि सरतेशेवटी घराच्या दुसऱ्या बाजूला असलेल्या आपल्या न्हाणीघराच्या खिडकीतून. घराच्या सर्व बाजूंनी झाडे होती. आणि त्यामुळे नेमक्या कोणत्या झाडावर आम्ही लपून बसलोय हे आम्ही 'ओ' देई पर्यंत तिला कळतच असे. काही वेळा मात्र वेडपट नेमका आमच्या

झाडाखाली येऊन भुंकायचा आणि आमचे गुपित उघडकीस आणायचा. फळतोडणीचा हंगाम आला की मोहनची त्या कामावर वर्णी लागायची. आंबे आणि लिची उन्हाळ्यात पिकायचे. त्यावेळी मी माझ्या वसतीगृहात असायचो. साहजिकच फळे गोळा करण्यात माझा हात नसायचा. पपया हिवाळ्यात तयार व्हायच्या हे खरे. पण पपईच्या झाडाचे खोड फार नाजूक आणि डुगडुगणारे त्यामुळे चढायला अयोग्य. लांब काडीने पपई पाडायची आणि तिला जमिनीवर पडू न देता वरच्यावर झेलायची.

लोणची घालण्यातसुद्धा मोहन आजीला मदत करायचा. आजीचे लोणचे सर्वत्र नावाजले जायचे. तिच्या कैरीच्या लोणच्याने तर सर्वांच्या तोंडाला पाणी सुटायचे. लिंबाचे लोणचेही तितकेच प्रसिद्ध होते. नवलकोल, मुळे, फुलकोबी, मिरच्या अशा अनेक भाज्या आणि फळांची आजी लोणची करायची. तिला कसलेही लोणचे घालता यायचे. अगदी नॅस्टरशमच्या बियांपासून ते फणसापर्यंत. केनकाकाला लोणची आवडत नसत. आणि म्हणूनच मी नवीन, वेगवेगळी लोणची तयार कर म्हणून आजीच्या पाठीमागे लागायचो.

मला स्वत:ला गोड चटण्या आणि सॉस अधिक आवडायचे. पण मी लोणचीही खात असे-अगदी झणझणीत असली तरीसुद्धा. एका हिवाळ्यात आजीच्या पैशाची गंगाजळी जरा कमी झाली होती. तेव्हा मी आणि मोहन तिची लोणची घेऊन विकायला घरोघरी गेलो.

इतक्या लोकांना आणि पाळीव प्राण्यांना आजी पोटभर जेवूखाऊ घालत असली तरी ती काही श्रीमंत नव्हती. तिचे घर तिला आजोबांकडून मिळाले होते. पण बँकेत तिचे फार थोडे पैसे होते.

आंब्यांच्या विक्रीतून दरवर्षी बऱ्यापैकी रक्कम मिळायची. आणि रेल्वे खात्याकडून थोडेसे निवृत्ती वेतनही मिळायचे. विसाव्या शतकाच्या सुरवातीच्या सुमाराला आगगाडी डेहरापर्यंत आणण्यासाठी पुढाकार घेणाऱ्यात आणि त्यासाठी मदत करणाऱ्यांपैकी आजोबा होते. पण या पलीकडे दुसरे काही उत्पन्न नव्हते.

आणि आता लक्षात येते की अधाशीपणे खावे असे तिचे जेवण असायचे खरे पण त्यात मुख्य पदार्थ एकच असायचा. आणि नंतर येणारा गोड पदार्थ. फक्त तिच्या हाताला अशी चव होती की ते रोजचे जेवण नसून मेजवानीच वाटायची.

आजीची लोणची विकण्यात मला अजिबात खटकायचे नाही. उलट मला तर ती तशी विकणे म्हणजे गंमतच वाटायची. मी आणि मोहन लोणच्याच्या बाटल्यांनी भरलेल्या करंड्या घेऊन आमच्या भागातल्या घरोघरी आनंदाने जायचो.

रस्त्याच्या पलीकडे असणारे मेजर क्लार्क आमचे सुरवातीचे गिऱ्हाईक

असायचे. त्यांचे केस तांबडे होते, डोळे निळे आणि चकाकणारे. आणि ते नेह्मीच खुषीत असायचे.

''आणि रस्टी, तू आता काय आणलंयस?'' ते विचारायचे.

''लोणची, सर.''

''लोणची? तू लोणची घालत होतास की काय?''

''नाही सर, ती माझ्या आजीने तयार केलीत. नाताळात टर्की विकत घेता यावी म्हणून आम्ही लोणची विकतोय.''

''मिसेस बाँडची लोणची ना? तुमच्या वाटेवर माझंच घर पहिलं असावं हे मी माझं नशीब समजतो. कारण मला खात्री आहे की तुमच्या करंड्या लवकरच रिकाम्या होतील. खरं सांगू का? तुझ्या आजीइतकी चांगली लोणची कोणालाही करता येत नाहीत. मी नेह्मीच म्हणत आलोय आणि आताही म्हणतो की चांगला स्वैपाक करता येणाऱ्यांची संख्या इतकी कमी असणाऱ्या या जगात तुझी आजी म्हणजे ईश्वरी वरदहस्त आहे. माझी बायको बाजाराला गेलीय म्हणून तर मी हे इतकं स्पष्ट बोलू शकतोय. यावेळी तू काय आणलंयस? भरलेल्या मिरच्या आहेत ना? माझी खात्री आहे त्या असतीलच म्हणून. आजीला माहितीय मला त्या फार आवडतात. भरलेल्या मिरच्या नसल्या तर नक्कीच मला वाईट वाटेल.''

करंडीमध्ये खरोखरच भरलेल्या लाल मिरच्यांच्या तीन बाटल्या होत्या. आणि मेजर क्लार्क यांनी त्या तिन्हीही विकत घेतल्या. तेथून आम्ही केलनर बाईंच्या घराकडे गेलो. कुमारी केलनर काहीही तिखट खात नसत. तेव्हा त्यांना लोणची दाखवून काहीच उपयोग नव्हता. पण त्यांनी आल्याच्या मोरंब्याची बाटली घेतली. त्यांनी मला छोटेसे प्रार्थना पुस्तक दिले. जेव्हा केव्हा मी त्यांच्याकडे जाई तेव्हा तेव्हा त्या मला एक प्रार्थना पुस्तक देत आणि दर वेळी तेच ते पुस्तक असायचे.

वाटेत पुढे डॉ० दत्तांचे घर होते. ते तेथील हॉस्पिटलचे प्रमुख होते. ''माझ्या यकृतासाठी या चांगल्या आहेत'' असे म्हणून त्यांनी कितीतरी लिंबाच्या लोणच्याच्या बाटल्या घेतल्या. रस्त्याच्या टोकाला श्री. श्रीहरी यांचे गराज होते आणि ते कोऱ्या करकरीत नवीन मोटारी विकायचे. त्यांनी कांद्याच्या लोणच्याच्या दोन बाटल्या घेतल्या आणि पुढच्या महिन्यातही अशाच दोन बाटल्या घेऊन यायला सांगितले.

आम्ही घरी परतेपर्यंत करंडी सहसा रिकामी होत असे आणि आजीला वीस किंवा तीस रुपये फायदा झालेला असे. त्या काळी तेवढ्या पैशात एक टर्की मिळायची.

केनकाका नाताळच्या सणाकरता म्हणून थांबला आणि टर्कीचा सर्वाधिक भाग त्यानेच खाल्ला.

"आता पुष्कळ दिवस झाली सुटी. आता तू नोकरी शोधणं हे बरं." एक दिवस आजी केनकाकाला म्हणाली.

"डेहरामधे फारशा नोकऱ्याच नाहीत" केनकाकाने तक्रार केली.

"तू असं कसं म्हणतोस? तू नोकरी करता कधी खटपट तरी केलीयस का? आणि तसंच म्हणायचं तर तू इथं कायमचंच राहायला हवंय असंही नाही. तुझी बहीण एमिली लखनौमधे एका शाळेची प्रमुख आहे. तुला तिच्याकडंही जाता येईल. तिनं पूर्वीच सांगितलंय की तुला तिथल्या वसतिगृहाचा प्रमुख करता येईल म्हणून."

"हं," केनकाका म्हणला. "मला खरं सांग मेकाकी, मी तिथल्या चाळीस पन्नास वाया गेलेल्या लहान मुलांना सांभाळात रहावं अशी तुझी इच्छा आहे का?"

"वाया गेलेल्या म्हणजे?" मी विचारले.

"गप्प बैस." केनकाका म्हणाला.

"वाया गेलेली म्हणजे थोडीशी वेडपट किंवा खोडकर," आजी म्हणाली.

"वेडपट म्हणायचं तर त्याला इतके प्रतिशब्द कशाला?" मी म्हणालो

"वेडपटला नुसतं वेडपट म्हणायचं, बस्स."

"आपल्याकडं एक वेडपट कुत्रा आहे. आणि आता केनकाकाही वेडपट."

केनकाकाने माझा कान पिरगाळला. आजी म्हणाली, "तुझा काका वेडपट नाही; त्याचा योग्य तो मान राख. तो फक्त आळशी आहे."

"आणि चमत्कारिक," मी म्हटले. "असं म्हणतात की तो चमत्कारिक माणूस आहे. असं मी ऐकलंय."

"कोण म्हणालं मी चमत्कारिक आहे असं?" केनकाकाने खडसावून विचारले.

"मिस लेस्ली," मी खोटेच सांगितले. मिस लेस्लीचे डेहराच्या भर बाजाराच्या जागी सौंदर्यप्रसाधन गृह होते. आणि ती काकाला खूप आवडते हे मला माहिती होते."

"माझा तुझ्यावर विश्वास नाही," केनकाका म्हणाला. "काही का असेना. तुझी आणि मिस लेस्लीची गाठ केव्हा पडली?"

"गेल्या आठवड्यात, तिनं आमच्याकडून पुदिन्याच्या चटणीची बाटली विकत घेतली. मी तिला सांगितलं की केनकाकाला पुदिन्याची चटणी खूप आवडते. तर ती म्हणाली की मी ती मिस्टर हॉटनसाठी घेतलीय. त्यांच्या बरोबर मी उद्या सिनेमाला जाणार आहे."

# केनकाकाचा आराम

डेहराच्या आजुबाजूची स्थळे पर्यटकांना दाखवणाऱ्या 'पर्यटन मार्ग दर्शकाची' अर्धवेळाची नोकरी केनकाकाला मिळाली हे ऐकून आम्ही आश्चर्यचकितच झालो.

नदीच्या काठाजवळ एक जुना किल्ला होता आणि सोळाव्या शतकातले हिंदू देवालय होते. दहा एक मैलांवर टेकड्यांमध्ये गंधकाचे-गरम पाण्याचे झरे होते.

तीन अमेरिकी पर्यटक जोडप्यांना गंधकाचे झरे दाखवायला आपण नेणार आहोत असे केनकाकाने आम्हाला सांगितले. आजीला आनंद झाला. काही का असेना पण केनकाका एकदाचा कामाला लागला होता.

डबाभर हॅम सँडविचेस, घरी भाजलेली बिस्किटे आणि एक डझन संत्री असे एका दिवसभराच्या सहलीला भरपेट होतील असे पदार्थ आजीने त्याला दिले.

गरम पाण्याचे झरे डेहरापासून फक्त दहा मैलावर होते. पण तीन दिवस होऊन गेले तरी आम्हाला केनकाकाचे पुनर्दर्शन झाले नाही.

परत आला तेव्हा त्याचा अवतार खरोखरच पाहण्यासारखा झाला होता. कपडे मळलेले आणि फाटलेलेसुद्धा. गाल बसलेले. आणि डोक्यावरचा टक्कलगोल उन्हाने लालभडक झालेला.

"अरे, तुझी अशी अवस्था व्हायला केलंस तरी काय?" आजीने विचारले.

व्हरांड्यातल्या आरामखुर्चीत कोसळून तो म्हणाला, "मेकाकी, मी भुकेला आहे. मला तू आधी काहीतरी खायला दे."

"तू तुझ्याबरोबर खायचं नेलं होतंस त्याचं काय झालं?"

"आम्ही सगळे मिळून सातजण होतो. आणि तू दिलेलं सगळं काही पहिल्याच दिवशी संपून गेलं."

"मग बरोबरच आहे. ते एका दिवसापुरतंच होतं. आम्ही गरम पाण्याच्या झऱ्यावर जाताहोत असं तू म्हणाला होतास."

"होय, आम्ही तिकडंच निघालो होतो," केनकाका म्हणाला. "पण आम्ही तिथं पोचलोच नाही. टेकड्यांवरच्या रस्त्यांच्या चक्रव्यूहात आम्ही घोटाळून गेलो."

"पण टेकड्यांवरचा रस्ता तू कसा चुकलास? नदीच्या काठानं सरळ चालायचं आणि मग टेकडी चढायची. तुला हे माहिती असायलाच हवं. तू वाटाड्या होतास. आणि पूर्वी तू तिथं जाऊनही आलाहेस."

"मला कबूल आहे." केनकाका पडलेल्या चेहऱ्याने म्हणाला.

"पण मी रस्ताच विसरलो. म्हणजे मला म्हणायचंय की मी दरीच विसरलो. म्हणजे मी त्यांना चुकीच्या दरीतून वर घेऊन गेलो. आणि मला आपलं वाटत राहिलं की नदीच्या पुढच्याच वळणावर गरम पाण्याचे झरे असतील म्हणून. पण ती नदी वेगळीच निघाली. तेव्हा आम्ही आपले चालत राहिलो आणि डोंगरांत शिरलो. मग मी खाली पाहिलं आणि माझ्या लक्षात आलं की आपण चुकीच्या दरीतून वर आलो आहोत. आम्हाला सगळी रात्र चांदण्यात काढावी लागली. तिथं फार गारवा होता. आणि पुढच्या दिवशी मला वाटलं की मसूरीमार्गे गेलो तर आम्ही लवकर परतू म्हणून. पण पुन्हा आम्ही चुकीच्या रस्त्यानं गेलो. आणि अखेरीला पोचलो ते केमटीला. मग तिथून आम्ही कसेबसे मोटारीच्या रस्त्यापर्यंत चाललो आणि बस पकडली."

केनकाकाला पलंगाकडं घेऊन जाण्यात आणि त्याच्यासाठी कांद्यांचे शक्तिवर्धक सार करण्यात सुद्धा मी आजीला मदत केली. एका तबकात ते सार घेऊन मी त्याच्याकडे गेलो. ते पिता पिता त्याने तोंड खूप वाकडे केले. आणि मग ते संपल्यावर "अजून हवंय" अशी मागणी केली.

दोन दिवस तो पलंगावर होता. आणि तेव्हा, एकदा आया आणि एकदा मी असे आलटून पालटून त्याचे जेवण त्याच्याकडे घेऊन जात होतो. पण त्याचे त्याला थोडेसुद्धा कौतुक वाटले नाही. मला वाटते की काही काका असेच असतात-ते कधीच मोठे होत नाहीत.

आजी मला नेहमी सांगायची की "भरपूर खात जा; पण अधाशीपणं पोटात मावणार नाही इतकं खात जाऊ नको. चांगले अन्न ही देवाची देणगी असते. पण इतर सगळ्या देणग्यांप्रमाणं तिचाही दुरुपयोग करता येतो."

तिने स्वैपाकाच्या म्हणींची यादीच तयार केली होती आणि ती कोठीच्या दारावर अडकवली होती-मला वाचता येणार नाही इतक्या उंचीवर नाही, त्याचप्रमाणे केनकाकाला वाचता येणार नाही इतकी खालीही नाही.

अशा काही म्हणी पुढीलप्रमाणे:

'रात्रीं अन्न कमी खाल्ले तर आयुष्य वाढते.'

'रिकाम्या थाळीपेक्षा छोटासा मासासुद्धा लखलाभ.'

'प्रत्येक गोष्टीत कसब लागते; अगदी लापशी बनवायला सुद्धा.'

'खाणे आणि पिणे यांच्या नादात माणसांनी विचारशक्तीला दूर करू नये.'

'घरातला वाळलेला पाव सुद्धा बाहेरच्या शिजवलेल्या मांसापेक्षा अधिक चांगला असतो.'

'चांगल्या जेवणामुळे बुद्धी तल्लख होते आणि हृदय मायाळू होते.'

'तुमच्या जिभेला तुमचा गळा कापू देऊ नका.'

आपले केस गळत आहेत आणि टक्कलाचे वर्तुळ वाढते आहे अशी केनकाकाने तक्रार केली तेव्हा आजीने आपली पाकक्रियेची जुनी वही काढली आणि त्यात टक्कलावरचा उपाय दिसतो का हे पाहिले. "एक उपाय आहे," ती म्हणाली, "आणि आजोबांनी तो आजमावला होता. त्यांना तो खूप उपयोगी पडला. ब्रँडीमध्ये हिरवी काकडी बुडवून मलम तयार करायचं आणि ते लावायचं."

"आपण तो उपाय करून पाहू या," केनकाका म्हणाला. आजीने काही हिरव्या काकड्या ब्रँडीमध्ये एक आठवडा बुडवून ठेवल्या आणि मग ती बाटली केनकाकाला देताना बजावले की यातलं थोडं थोडं मलम त्याच्या टक्कलावर सकाळ संध्याकाळ चोळायचं.

दुसऱ्या दिवशी आजी केनकाकाच्या खोलीत गेली तेव्हा तिला बाटलीत फक्त हिरव्या काकड्याच दिसल्या. केनकाकाने सर्वच्या सर्व ब्रँडी पिऊन टाकली होती.

केनकाकाला शीळ घालायला आवडायची.

काहीच करायला नसल्यामुळे दोन्ही हात खिशात घालून तो घरात, बागेत, रस्त्यावर आपल्यालाच आपली शीळ ऐकवत रमत गमत असे.

तो सतत एकच एक शीळ घालायचा- स्वतः सोडून इतर कोणालाही स्वर न समजणारी.

"केनकाका, तुम्ही आज शिळेवर काय म्हणताय?" मी विचारे.

"ओल्ड मॅन रिव्हर, तुला ओळखू नाही येत?"

आणि दुसऱ्या वेळी तशीच्या तशीच शीळ घालत असताना मी विचारे. "केनकाका, तुम्ही अजूनही 'ओल्ड मॅन रिव्हर' च वाजवताय ना?"

"नाही, मुळीच नाही. हे 'डॅनी बॉय' गाणे आहे. तुला दोहोतला फरक नाही जाणवत?"

आणि तो तसाच अजागळपणे बिनचालीची शीळ घालत निघून जाई.

काही काही वेळी आजीला त्याची फार कटकट वाटायची.

"केन, तुला सतत शीळ घालावीच लागते का? मला तिचा फार त्रास होतो. शीळ घालत बसण्याऐवजी तू एखादे वेळी तरी गाणं म्हण की."

"शक्य नाही. हे 'दि ब्लू डॅन्यूब' आहे. त्यात एकही शब्द नाही." आणि तो सगळ्या स्वैपाकघरात वॉल्ट्झ नृत्य करत आणि शीळ घालत राहायचा.

"हे बघ, तू तुझं वॉल्ट्झ आणि शीळ घेऊन व्हरांड्यात जा पाहू," आजी म्हणाली. "हे असलं काही मी स्वैपाकघरात चालू देणार नाही. त्याच्यामुळं स्वैपाक बिघडतो."

दाताच्या डॉक्टरने केनकाकाचा खराब दात काढून टाकला तेव्हा आम्हाला वाटले की आता त्याचे शीळ घालणे संपेल. परंतु ते उलट अधिकच मोठ्याने आणि कर्कश झाले.

एक दिवस नेहमीप्रमाणे खिशात हात घालून आणि काहीही काम नसल्यामुळे रमत गमत आणि मोठ्याने शीळ घालत तो रस्त्याने चालला होता. त्यावेळी एक मुलगी सायकलवरून त्याच्या जवळून जात असताना एकदम थांबली. सायकलवरून उतरून तिने त्याचा रस्ता अडवला.

"हे बघ, केनेथ बाँड, मी जाताना मला पाहताच तू प्रत्येक वेळी अशीच शीळ घालत राहिलास," ती म्हणाली, "तर मी माझ्या भावाला सांगून तुला चांगलाच बदडून काढेन."

काका टरकला. त्याचे गाल लाल लाल झाले. "मी तुला शीळ घालत नव्हतो," तो म्हणाला.

"असं होय? पण मला तर रस्त्यावर आपल्या दोघांशिवाय अजून कोणीही दिसत नाही."

"मी 'गॉड सेव्ह दि किंग' हे गाणं म्हणत होतो. तू ते ओळखलं नाहीस?"



# केनकाका नोकरीला लागतो

"या केनकाकाच्या बाबतीत आपण काहीतरी करायला हवं," सगळ्या जगाला उद्देशून आजी म्हणाली. मटार सोलता सोलता थोडे दाणे अधून मधून आपल्या तोंडात घालत मी त्यावेळी तिच्याबरोबरच स्वैपाकघरात होतो. सयामी मांजर सुझी पलीकडच्या फळीवर शांतपणे बसून आजी आयरीश लापशी तयार करताना पाहात होती. सुझीला आयरीश लापशी फार आवडायची.

"म्हणजे तो इथं राहतो याचं मला काही वाटत नाही." आजी म्हणाली, "आणि मला त्याच्याकडून काही पैसे हवेत असंही नाही. परंतु एखाद्या तरुणानं इतके दिवस काहीही न करता आळसानं जगावं हे बरोबर नाही."

"आजी, केनकाका तरुण आहे का?"

"तो चाळीस वर्षांचा आहे; प्रत्येक जण म्हणतो की तो अजून मोठा झाला की आपोआप सुधारेल."

"त्याला इथून जाऊन मेबल आत्त्याकडं राहता येईल."

"तो जातोच आणि राहतो की मेबल आत्त्याकडं. तो एमिली आत्त्या आणि बेरील आत्त्याकडं सुद्धा राहतो. तेच तर त्याचं खरं दुखणं आहे. त्याचे लाड करणाऱ्या त्याला अनेक बहिणी आहेत. त्या सर्व तो आहे तसा मान्य करतात आणि आपल्याकडं ठेवून घेतात. त्या सगळ्यांचे नवरे पैसेवाले आहेत आणि हा अधून मधून आपल्याकडं राहिला तरी त्याचं त्यांना काही वाटत नाही. मग आपला केन तीन महिने एमिलीकडं राहतो आणि तीन महिने माझ्याकडं. अशा रीतीने तो सगळ्यांचा पाहुणा म्हणून सहजगत्या वर्ष काढतो. आणि आपल्या स्वत:च्या जगण्याकरता आपण स्वत: पैसे कमवायला हवेत असा विचार सुद्धा त्याला करावा वाटत नाही."

"एक प्रकारे तो नशीबवान आहे," मी म्हणालो.

"त्याचं नशीब कायम टिकणार नाही. आपण न्यूझीलंडला जावं असं मेबल

आताच म्हणतेय. आणि एकदा भारत स्वतंत्र झाला की- म्हणजे येत्या एकदोन वर्षांत- एमिली आणि बेरील बहुधा इंग्लंडला जातील. कारण त्यांचे नवरे सैन्यात आहेत आणि सर्वच्या सर्व ब्रिटिश अधिकारी भारतातून परतणार आहेत."

"त्यांच्या पाठोपाठ केनकाकाही इंग्लंडला जायचा नाही का?"

"तिकडं गेलं तर आपल्याला काम करावं लागेल हे त्याला माहितीय. तिथं इथल्यासारखे नोकरचाकर नसतील. आणि त्यांच्याशिवाय आपल्या स्वतःला सगळं काही करावं लागतंय हे तुझ्या आत्त्यांना कळलं की त्या केनकाकाला आपल्या घरी अधिक काळ ठेऊन घेणार नाहीत. आणि इतर सगळं सोड पण न्यूझीलंडला किंवा इंग्लंडला जाण्याकरता लागणाऱ्या त्याच्या तिकिटाचे पैसे कोण भरणार आहे?"

"तिकडे जाता आलं नाही तर केनकाका मग तुझ्याकडंच राहील, नाही का? तू इथंच राहणार आहेस ना?"

"पण ते कायमचं थोडंच आहे? मी जिवंत असेपर्यंतच."

"तू इंग्लंडला जाणार नाहीस?"

"नाही. मी इथंच वाढलेय. मी झाडासारखी आहे. माझं मूळ इथल्या मातीत खोल रूजलं आहे. मी दुसरीकडं जाणार नाही-म्हणजे जोवर एखाद्या जुन्या झाडाला नवीन पानं यायचं अगदीच थांबतं तसं होइस्तोवर. तू मात्र अजून थोडा मोठा झालास की जाशील. तू बहुधा तुझं शालेय शिक्षण इंग्लंडमध्येच पूर्ण करशील."

"मला म्हणशील तर ते इथंच पुरं करायचंय. माझ्या सगळ्या सुट्या तुझ्याकडं घालवायच्यात. मीच इंग्लंडला गेलो तर तू म्हातारी झाल्यावर तुझी कोण काळजी घेईल?"

"मी आत्ताच म्हातारी आहे. साठ वर्षांच्या पुढं."

"म्हणजे खरी अगदी म्हातारी नाहीस. तू केनकाकापेक्षा जरा मोठी एवढंच. पण जेव्हा तू खरोखर म्हातारी होशील तेव्हा केनकाकाचं कोण करील?"

"मनात आणलं तर त्याला स्वतःचं स्वतःला पाहता येईल. आणि त्यानं लवकरात लवकर तसं करायला सुरवात करावी अशीच आता वेळ आलीय. त्यानं आता तरी नोकरी करायला हवी."

मी खूप विचार केला. पण केनकाकाला योग्य अशी नोकरी मला तरी दिसेना- किंवा, तसे म्हणायचे तर, केनकाकाला नोकरीकरता योग्य माणूस समजेल असा कोणीही माणूस मला दिसेना. अशा वेळी आयाने सुचवले.

"गुलशनच्या महाराणीला मुलांना शिकवण्यासाठी मास्तर हवाय. त्यांना फक्त एक मुलगा आणि एक मुलगी आहे."

"तुला कसं कळलं?" आजीने विचारले.

''मला मुलांच्या आयाकडून कळलं. फारसं काम नाही. आणि पगार दोनशे रुपये. रोज सकाळी फक्त दोन तास शिकवायचं.''

''ही नोकरी केनकाकाला योग्य आहे,'' मी म्हटले.

''होय, ही खरंच चांगली नोकरी आहे,'' आजी म्हणाली. तिच्यासाठी अर्ज करायला आपण केनला भाग पाडलं पाहिजे. त्यानं त्यांच्याकडं जाऊन स्वतः त्यांची भेट घेतली पाहिजे. महाराणी चांगली बाई आहे. तिच्याकरता काम करणं कधीही चांगलंच.''

त्यांच्याकडं प्रत्यक्ष जाऊन नोकरीबद्दल विचारायचं केनकाकाने कबूल केलं. तो गेला तेव्हा महाराणीसाहेब कुठेतरी बाहेर गेल्या होत्या. पण त्याची मुलाखत महाराजांनी घेतली.

''तुम्हाला टेनिस खेळता येतं का?'' त्यांनी केनकाकाला विचारले.

''होय,'' केनकाका म्हणाला. शाळेत असताना आपण थोडंफार टेनिस खेळलो आहोत हे त्याला बरोबर आठवले.

''मग ही नोकरी तुमची आहे असं समजा. दुहेरी सामन्यासाठी चवथा खेळाडू कसा मिळवावा या विवंचनेत मी होतो. पण ते असो. तुम्ही केंब्रिजला होता का?''

''नाही, मी ऑक्सफर्डला होतो,'' केनकाका म्हणाला. महाराजांवर बरोबर छाप पडली. ऑक्सफर्डचा टेनिस खेळता येणारा असाच माणूस आपल्या मुलांना शिकवण्यासाठी हवा असेच त्यांचे मत होते.

आजीला या मुलाखतीबद्दल सांगितले तेव्हा ती म्हणाली, ''पण केन, तू ऑक्सफर्डला शिकायला कधीच नव्हतास. तू असं कसं म्हणालास?''

''मी अर्थातच ऑक्सफर्डला होतो. तुझा भाऊ जिम याच्या बरोबर मी दोन वर्षं तिथं काढलीत हे तू विसरलीस की काय?''

''नाही, विसरले नाही. पण तू तिथं दारूच्या गुत्त्यात त्याचा मदतनीस म्हणून होतास. तू कधीच ऑक्सफर्डला विद्यापीठात नव्हतास.''

''ठीक आहे की. मी तिथं शिकत होतो का असं महाराजांनी मला मुळीच विचारलं नाही. त्यांनी मला विचारलं, 'तुम्ही केंब्रिजला होता काय?' आणि मी म्हणालो, 'नाही, मी ऑक्सफर्डला होतो.' आणि ते खरंच आहे. मी ऑक्सफर्डला काय करत होतो हे त्यांनी मला विचारलंच नाही. मग माझं काय चुकलं?'' आणि शीळ घालत तो तेथून सावकाश निघून गेला.

केनकाकाने आपल्या नोकरीत बस्तान बसवले हे पाहून आम्ही तसे चकितच झालो. पण सुरवातीला तरी ते खरेच होते.

महाराज इतके काही खराब टेनिसपटू होते की आपल्याहूनही कोणी वाईट खेळाडू असेल अशी त्यांना अपेक्षाच नव्हती. पण तशी व्यक्ती आहे याचा आता पुरावा मिळाल्यावर ते फारच खुषीत आले. तेव्हा दुहेरीसाठी महाराजांचा साथीदार होण्याऐवजी तो एकेरी सामन्यात महाराजांचा आवडता प्रतिस्पर्धी झाला. आणि महाराजांकडून पराभव पत्करत राहील तेवढा काळ त्याची नोकरी सुरक्षित होती.

टेनिसचा खेळ आणि महाराजांबरोबरच्या बदकांच्या शिकारी व्यतिरिक्तच्या वेळात केनकाकाने मुलांना काही धडे शिकवले. त्याने त्यांना वाचायला, लिहायला शिकवले आणि अंकगणितही शिकवले. तो मला कधी कधी बरोबर घेऊन जायचा. त्यावेळी त्याने केलेल्या हिशोबात तो कुठे चुकला आहे हे मी त्याला सांगत असे. केनकाकाला बेरीज वजाबाकी फारशी नीट येत नव्हती.

महाराजांची मुले माझ्यापेक्षा लहान होती. तेव्हा, "रस्टी, ही हिशोब नीट करतायत की नाही ते पहा बरं जरा." असे मला सांगून खिशात हात आणि तोंडाने स्वरविरहित शीळ घालत तो टेनिस कोर्टावर जात असे.

तो शिकवत असलेल्या दोन्ही विद्यार्थ्यांची एकाच गणिताची वेगवेगळी उत्तरे आली तरी तो त्या दोघांनाही शाबासकी देई.

"उत्तम, उत्तम. तुम्ही दोघांनीही मनापासून प्रयत्न केले हे पाहून मला आनंद वाटला. तुमच्यापैकी एकजण बरोबर आहे आणि एकजण चूक. पण मला तुमच्यापैकी एकाच्याही उत्साहाला आळा घालायचा नाही. म्हणून मी कोणाचे चूक आणि कोणाचे बरोबर हे सांगणार नाही."

पण नंतर, घरी जात असताना, तो मला विचारे,

"रस्टी, कोणाचं उत्तर बरोबर होतं?"

"केनकाका, त्या दोघांचीही उत्तरं चूक होती."

आपण महाराजांना टेनिसमध्ये हरवले नसते तर आपली नोकरी कधीही गेली नसती असे केनकाकाचे ठाम मत होते.

म्हणजे आपण जिंकावे असा केनकाकाचा कधीही हेतू नव्हता. परंतु अधूनमधून महाराजांचा चिटणीस आणि त्यांचे पाहुणे यांच्याबरोबर खेळल्यामुळे त्याचे टेनिस सुधारले होते. आणि त्यामुळे आपण हरावे असा कितीही प्रयत्न केला, तरी तो महाराजांना हरवूनच बसला.

महाराजांचा चेहरा रागाने लालीलाल झाला.

"मिस्टर बाँड," ते जरबेने म्हणाले. "स्वत: हरण्याला किती महत्व असतं ते मला वाटतं तुम्हाला माहितीच नसावं. सगळेच जिंकणं शक्य नसतं हे तुम्हाला

माहितीच असेल. हरणारे लोक नसते तर या जगाचे काय झाले असते.''

''महाराज, मला खरोखरच फार वाईट वाटतंय,'' केनकाका म्हणाला. ''आजच्या खेळात मी जिंकलो ते निव्वळ नशिबानं.''

महाराजांनी केनकाकाला माफ केले. परंतु एक आठवड्यानंतर पुन्हा तेच घडले. केनकाका जिंकला आणि त्याच्याशी एक चकारही शब्द न बोलता महाराज रागारागाने कोर्ट सोडून निघून गेले.

दुसऱ्या दिवशी तो शिकवणीच्या वेळेला हजर राहिला. नेहमीप्रमाणे तो आणि मुले शून्य आणि फुलीचा खेळ खेळण्यात रमले होते.

''मिस्टर बाँड, उद्यापासून तुम्ही नोकरीला यायची गरज नाही.'' महाराज उद्‌गारले. ''मी माझ्या चिटणीसाला नोटीस न दिल्याबद्दल एक महिन्याचा पगार द्यायचा हुकूम केला आहे.''

हात खिशात घालून आणि आनंदाने शीळ घालत केनकाका घरी परत आला.

''तू लवकर आलाहेस?'' आजी म्हणाली.

''त्यांना आता माझी गरज उरली नाही,'' केनकाका म्हणाला.

''असं? हरकत नाही. आत ये आणि तुझा चहा घे.''

ही नोकरी फार दिवस चालणार नाही अशी आजीची अटकळच असावी. आणि ती अशा गोष्टीवरून वेडेवाकडे बोलत राहणारी नव्हती. ती नंतर म्हणालीच, त्यानं निदान प्रयत्न तरी केला आणि ही नोकरी त्याच्या इतर नोकऱ्यांपेक्षा अधिक काळ म्हणजे चक्क दोन महिने टिकली.''



# चक्रधारी केनकाका

पुढच्या वेळी डेहराला आलो तेव्हा मला स्टेशनवर मोहन् भेटला. माझे सामान घेऊन आम्ही एक टांगा केला आणि डेहराच्या शांत रस्त्यांवरून खडखडत आणि घुंगरांचा आवाज करत आजीच्या घरी आलो.

"मोहन, मला एकदा इथली सगळी बातमी दे."

"विशेष सांगण्यासारखं असं काहीच नाही. काही साहेब घरे विकून दुसरीकडं गेले आहेत. सुझीला पिल्लं झालीत."

मी दोन रात्र आगगाडीत होतो याची आजीला जाणीव होती. आणि तिने माझ्याकरता खूप मोठी न्याहरी तयार केली होती. लापशी, अंड्याची भुर्जी आणि भाजलेला पाव, डुकराच्या मासाबरोबर तळलेले टोमॅटो, भाजलेला पाव, संत्र्याचा मुरंबा आणि गोड दुधाचा चहा.

"केनकाकाकडून पत्र आलंय." ती म्हणाली, "सिमल्यातल्या फिरपोच्या हॉटेलात त्याला सहायक व्यवस्थापक म्हणून नेमलंय असं तो म्हणतो. पगार चांगला आहे. राहायला खायला फुकट आहे. ही चांगली नोकरी आहे. इथं तरी त्यानं टिकावं असं मला वाटतं."

तीन दिवसांनी केनकाका पुन्हा आपला बिछाना आणि पोचे आलेली पेटी घेऊन व्हरांड्यात हजर.

"तू हॉटेलची नोकरी सोडून दिलीस?" आजीने विचारले.

"नाही," केनकाका म्हणाला. "त्यांनी हॉटेलच बंद केलं."

"तुझ्यामुळं तर तसं झालं नाही ना?"

"नाही, मेकाकी. थंड हवेच्या ठिकाणातली सगळीच मोठी हॉटेलं बंद होऊ लागलीत."

"काही हरकत नाही. आत ये आणि जेवायला बस. आज कोफ्त्याचा रस्सा आहे. रस्टीच्या आवडीचा."

"ओहो- तोही इथंच आहे? मला खूप्च भाचे भाच्या आणि पुतणे पुतण्या आहेत. तसं पाहिलं तर मेबलच्या त्या दोन मुलींच्या मानानं हा ठीक आहे. मी सिमल्याला त्यांच्याकडं होतो तोपर्यंत त्यांनी मला नुसतं सळो की पळो करून सोडलं होतं."

दुपारची जेवणे आटोपल्यावर केनकाकाने नोकरी मिळवायचे मार्ग व शक्यता याचा खूप गंभीरपणे ऊहापोह केला.

अख्ख्या डेहरामध्ये फक्त एकच टॅक्सी आहे. तो म्हणाला, "तेव्हा दुसऱ्या टॅक्सीचा धंदा चालायलाच हवा."

"मलाही तसंच वाटतं," आजी म्हणाली. "पण त्याचा उपयोग काय आहे? पहिलं म्हणजे तुझ्याजवळ टॅक्सी नाहीयै. आणि दुसरं म्हणजे तुला मोटार चालवता येत नाही."

"मला ती लागलीच शिकता येईल. गावात मोटार चालवायला शिकायची सोय आहे. आणि मी काकांची जुनी मोटार वापरेन. ती नुसतीच धूळ खात गॅरेजमधे पडून आहे."

(तो आजोबांच्या जुन्या हिलमन रोडस्टरबद्दल बोलत होता. ती 1925 सालातली होती.)

"मला नाही वाटत ती आता चालेल म्हणून," आजी म्हणाली.

"का नाही चालणार? तिला फक्त थोडंफार तेलपाणी केलं आणि थोडं रंगकाम केलं की झालं."

"ठीक आहे. तू मोटार चालवायला तर शीक. मग आपण पाहू रोडस्टरचं काय करायचं ते."

केनकाकाने मोटार चालवण्याचे शिक्षण घ्यायला सुरवात केली. तो त्या बाबतीत अगदी नियमित होता. रोज संध्याकाळी तो एक तास शिकायला जायचा. फी आजी द्यायची.

एक महिना झाल्यावर केनकाकाने आपल्याला मोटार चालवता येते आणि आपण रोडस्टर बाहेर काढून ती चालते की नाही हे पाहणार आहोत असे जाहीर केले.

"तुला अजून मोटार चालवायचा परवाना मिळालेला नाही," आजी म्हणाली.

"अग, मी तिला फार लांब नेणार नाही," केनकाका म्हणाला.

"इथल्या इथंच रस्त्यानं थोडं पुढं मागं चालवणार."

सकाळभर तो गाडी साफ करत होता. पेट्रोल आणण्यासाठी त्याला आजीने पैसे दिले.

चहा झाल्यावर केनकाका म्हणाला.

''रस्टी, चल आता. आत बैस. मी तुला गाडीतून एक चक्कर मारून आणतो. मोहनलाही बरोबर घेऊन ये.''

मला आणि मोहनलाही आपला जीव धोक्यात घालायचा नव्हता. ''पुढच्या वेळी, केनकाका,'' मी म्हटले.

''केन, तू आता उगीच वेगानं जाऊ नकोस हं,'' आजी काळजीने म्हणाली. ''तुला अजून गाडीची सवय झाली नाहीयै.''

केनकाकाने मान डोलावली, तो हसला आणि त्यानं मोटारचा भोंगा दोनदा वाजवला. तो स्वत:वरच अगदी खूष झाला होता. कुमारी केलनर संध्याकाळचे फिरण्यासाठी बाहेर पडत होत्या. त्यांनी रोडस्टर आणि तिच्या चक्राशी बसलेला केनकाका पाहिला आणि त्या पुन्हा पटकन आत गेल्या.

केनकाका जोराने, आणि सतत भोंग्याचा आवाज करत सरळ गेला. रस्त्याच्या शेवटाला परत येण्यासाठी वळसा होता. आपणही इथून वळायचे आणि गाडी पुन्हा परत न्यायची असे केनकाकाने ठरवले.

त्याने गाडीचे चक्र फिरवले. वळणावरून गाडी वळू लागली पण गाडी वळवणारे चक्र पूर्णपणे, निदान केनकाकाला हवे होते तितके तरी वळेना. तेव्हा पूर्ण वळसा घेण्याऐवजी त्याने उजव्या बाजूला गाडी वळवली. आणि तो उजवीकडे सरळ जाऊ लागला. अगदी थेट गुलशन महाराजांच्या बागेच्या भिंतीला धडक देऊन आणि ती एकेरी विटांची भिंत पाडून स्वत:ला आणि वाहनाला काहीही इजा न होता केनकाकाने बागेतल्या हिरवळीवर नेऊन गाडी उभी केली.

ते पाहून खुद्द महाराजांनी तिकडे धाव घेतली. आणि साहजिकच त्यांच्या पाठोपाठ त्यांचे चिटणीस आणि मदतनीस धावले.

गाडीच्या चक्राला धरून बसलेल्या केनकाकाला पाहून महाराज खूष झाले.

''अरे वा! अलभ्य लाभ, दोस्त.'' महाराज उद्गारले. ''माझी भेट घ्यायला आलात याचाच मला आनंद वाटतो. आता आपण टेनिसचा एक डाव खेळायलाच हवा.''

# केनकाका क्रिकेटच्या मैदानावर

महाराजांची मर्जी पुन्हा संपादली असली तरी केनकाका अजूनही बेकारच होता.

हिलमन गाडी पुन्हा बाहेर काढायला आजीने साफ नकार दिल्यामुळे आपण आता रूसून दाखवावे असा त्याने बेत केला. दहा वर्षांपूर्वी, आजोबा जिवंत होते तेव्हा त्यांनी गाडी वळवायच्या चक्राकडे नीट लक्ष दिले नव्हते, तेव्हा ही सगळी आजोबांची चूक आहे असा त्याने दावा केला. नाश्ता आणि चहा यांमध्ये दोन तास कडक उपास करून त्याने अन्यायाविरूद्ध अहिंसक प्रतिकार केला. आणि कितीतरी दिवस आम्ही त्याची शीळही ऐकली नाही.

''शांततेत किती सुख असतं,'' आजी म्हणाली.

आणि मग शेवटी आपण आता लखनौला एमिली मावशीकडे राहायला जाणार आहोत असे त्याने जाहीर केले.

''तिला तिची तीन मुलं आणि शाळा यांच्याकडं बघावं लागतं,'' आजी म्हणाली. ''तिथं उगीच फार दिवस राहू नकोस.''

''*तिला* चालतं मी कितीही दिवस थांबलं तरी,'' केनकाका फुगून म्हणाला आणि तेथून चालता झाला.

त्याची लखनौ-भेट अविस्मरणीय ठरली. त्याबद्दल आम्हाला कळले ते मात्र खूप दिवसांनी.

केनकाका लखनौ स्टेशनवर उतरतो तोच एकदम अचानकपणे त्याच्याभोवती गर्दी उसळली. जो तो त्याच्याकडे पाहून हात हलवत होता आणि हिंदी, उर्दू, किंवा इंग्रजीत त्याचे स्वागत करत होता. हा काय प्रकार आहे हे कळण्यापूर्वीच त्याच्या गळ्यात खचाखच झेंडूचे हार घालण्यात आले. मग एक तरूण पुढे झाला आणि त्याने जाहीर केले की ''गोमती क्रिकेट संस्था इतिहासप्रसिद्ध लखनौ शहरात आपले स्वागत करत आहे.'' आणि मग तो पटदिशी केनकाकाला स्टेशनच्या बाहेर घेऊन

त्यांची वाट पहात असलेल्या गाडीकडे घेऊन गेला. क्रीडांगणापुढे ती मोटार जाऊन थांबली तेव्हा कुठे केनकाकाला कळले की आपल्याला क्रिकेटचा सामना खेळायचा आहे.

जे घडले ते असे होते:

ब्रूस हॅलम नावाचा प्रसिद्ध इंग्रज क्रिकेटपटू भारताच्या दौऱ्यावर आला होता आणि लखनौला कोणाच्यातरी मदतीसाठी होणाऱ्या सामन्यात आपण खेळू असे त्याने कबूल केले होते. परंतु दुसऱ्या दिवशी लखनौला जाणारी गाडी पकडायची तर आदल्या रात्री बिघडल्या पोटी दिल्लीत झोपल्यामुळे त्याला उठायला उशीर झाला होता. सामना ठरवणाऱ्या लखनौमधल्या व्यवस्थापकांना त्याने त्याबद्दल तार पाठवली होती. पण इतर अनेक तारांप्रमाणे ती पोचलीच नाही. साहजिकच लखनौमधल्या क्रिकेट शौकिनांची गर्दी एवढ्या मोठ्या क्रिकेटपटूचे स्वागत करायला स्टेशनवर उसळली होती. आणि सगळ्यात आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे, कसे कोण जाणे पण, केनकाका आणि ब्रूस हॅलम यांच्या दिसण्यात कमालीचे साधर्म्य होते. अगदी डोक्यावरच्या टक्कलाच्या आकारामध्येही. त्यामुळे लोकांचा गोंधळ झाला होता. आणि अर्थातच केनकाकाला तर गोंधळामधे घुसायची हौसच होती.

क्रीडागारात गोमती क्रिकेट मंडळीतर्फे एवढे मोठे स्वागत स्वीकारल्यावर आणि उत्कृष्ट न्याहरी घेतल्यावर केनकाकाला वाटले की या शौकिनांपुढे आपण आता क्रिकेट खेळायचे नाकारले तर ते खेळाडूवृत्तीचे ठरणार नाही. 'आपल्याला जर टेनिसचा चेंडू फटकारता येतो,' त्याने विचार केला, 'तर आता क्रिकेटचा चेंडूही फटकारता येईल.' आणि सुदैवाने त्याने घेतलेल्या कपड्यांमधे खेळाडूंचा कोट आणि पांढऱ्या फ्लॅनलची विजार होती.

गोमती संघाने नाणेफेक जिंकली आणि प्रथम फलंदाजी करायचे ठरवले. ब्रूस हॅलमची फलंदाजीची नेहमीची पाळी तिसरी होती. त्यामुळे केनकाकाही एक गडी बाद झाल्यावर फलंदाजीला जाणार हे ओघानेच आले. आणि थोड्याच वेळात पायाला बांधायचे हे पायबंद (पॅड्स) यापेक्षा सोयिस्कर असे अजून कोणी का तयार केले नाहीत असा विचार करत केनकाका फलंदाजीकरता खेळपट्टीवर जाऊ लागला.

त्याच्याकडे टाकलेला पहिला चेंडू आखूड टप्प्याचा होता. त्यामुळे त्याच्याशी टेनिसप्रमाणे खेळायचे त्याला जमले आणि त्याने आडव्या बॅटने चेंडू मिड-विकेटच्या बाजूला सीमारेषेवर फटकारला. प्रेक्षकांनी टाळ्यांचा गजर केला.

दुसरा चेंडू केनकाकाच्या पायबंदाला लागला. खरे म्हणजे तेव्हा तो यष्टीच्या

बरोबर समोर उभा होता आणि त्याला पायचित म्हणून पंचांनी बाद ठरवायला हवे होते. परंतु पंचाने बोट वर करायला नकार दिला. नाही म्हटले तरी ब्रूस हॅलमचा खेळ पाहायला शेकडो लोक स्वत:च्या घामाचे पैसे खर्चून तेथे जमा झाले होते आणि त्या सर्वांची निराशा करणे योग्य ठरले नसते.

''नाबाद!'' पंचाने जाहीर केले.

तिसरा चेंडू केनकाकाच्या बॅटीच्या कडेला लागून स्लिपमधून निसटला.

''किती छान चेंडू मारलाय!'' एक वयोवृद्ध प्रेक्षक पॅव्हिलियनमधे उद्गारले.

''एक अप्रतिम *लेटकट!*'' दुसरा प्रेक्षक उद्गारला.

चेंडू सीमापार गेला आणि केनकाकाच्या खात्यात चार धावा मांडल्या गेल्या. मग पहिले षटक संपले आणि दुसऱ्या फलंदाजाची खेळण्याची पाळी आली. पहिल्याच चेंडूला त्याने एक धाव घेतली. आणि दुसऱ्याही धावेकरता हाक मारली. केनकाकाच्या मते एक धाव भरपूर होती. एखाद्या वेड्यासारखे या यष्टीपासून त्या यष्टीपर्यंत उगीचच आपले धावत सुटायचे म्हणजे काय? आणि तो खेळपट्टीच्या मध्यावर असताना विरूद्ध बाजूच्या खेळाडूने बरोबर यष्टीवर चेंडू मारला. केनकाका निश्चितपणेच धावबाद झाला होता. त्याबद्दल कोणाच्याही मनात शंका उद्भवायलाही यावेळी जागा नव्हती.

प्रेक्षकांच्या सहानुभूतीच्या टाळ्या मिळवत केनकाका क्रीडागाराकडे परत आला.

''त्याची काही चूक नाही,'' वयस्कर गृहस्थ उद्गारले. ''दुसऱ्या फलंदाजानं विनाकारणच, दुसऱ्या धावेची शक्यता नसतानाही, तिच्याकरता हाक मारली. पण काही का असेना स्लिपमधून मारलेली अप्रतिम *लेटकट* पाहायला मिळाली यातच कानपूरहून इथं आल्याचं सार्थक झालं!''

दुपारच्या जड फराळाचा केनकाकाने यथेच्छ समाचार घेतला. आणि मग, गोमटी संघाला बहुतेक वेळ क्षेत्ररक्षणच करावे लागणार-म्हणजे अधिक काळ पळावे लागणार हे ओळखून केनकाकाने क्रीडागारामधून हळूच सू बाल्या केला, आणि क्रीडांगणाच्या बाहेर एक टांगा करून तो छावणीमध्ये एमिली मावशीच्या घरी गेला.

तो पोचला तेव्हा तेथे दुपारच्या जेवणाची मांडामांड सुरू होती आणि इकडे मैदानात समज झाला की ब्रूस हॅलम अलाहाबादची गाडी पकडण्यासाठी लवकर निघून गेला-तेथेही त्याने एका मदतीच्या सामन्यात भाग घ्यायचे कबूल केले होते.

एमिली मावशी एकदम कडक शिस्तीची स्त्री होती. तिने केनकाकाला एक आठवडा आरामात खायला घातले पण नंतर तिच्या शाळेच्या लहान मुलांच्या वसतिगृहात सक्तीने काम करायला भाग पाडले. तेथून आजीच्या घरी पळून येण्यासाठी लागणारे पैसे साचवायला त्याला अनेक महिने लागले.

तथापि, त्या थोर ब्रूस हॅलमच्या एकंदर धावांमधे चार धावाची भर घातली याचे त्याला समाधान वाटत होते. गोमती क्रिकेट मंडळीच्या नोंदणी पुस्तकात ही गोष्ट भविष्यकाळासाठी नोंदून ठेवण्यात आली.

| | | |
|---|---|---|
| बी. हॅलम | धावबाद | 4 |

गोमती संघाचा त्या सामन्यात पराभव झाला. पण, केनकाकाला पूर्णपणे पटलेल्या तत्त्वज्ञानानुसार—हरणारे नसले तर कसं व्हायचं?



# मोंबासाची रोमहर्षक योजना

शाळेच्या मुख्य दालनावर असलेल्या मोठ्या घड्याळात अकराचे ठोके पडले तेव्हा मी हळूच गादीवरून उठलो, व्यायामाकरता घालायचे कॅनवासचे जोडे चढवले आणि हळूच अगदी चोरून खोली ओलांडली.

दाराशी आल्यावर मी थांबलो आणि पाठीमागच्या अंधाऱ्या खोलीत कोणी उठले तर नाही ना हे निरखून पाहिले. मग मी घाईघाईने तेथील चिंचोळी वाट ओलांडली आणि पायऱ्यांवरून खाली उतरलो. दलजित आधीपासूनच व्हरांड्यात होता. तो शीख होता. रात्र होती म्हणून त्याने फेटा बांधलेला नव्हता आणि आपल्या लांब केसांचा अंबाडा बांधला होता. त्याने पांढरा पायजमा घातला होता आणि तो अंधारातल्या दीपस्तंभासारखा वाटत होता! कुठलेही शिक्षक आजुबाजूला असते तर त्यांना आम्ही त्यांना दिसलो असतो.

मला पाहताच त्याने आपले बोट ओठांवर टेकवले. खरे म्हणजे त्याची काहीच जरुरी नव्हती. कारण आम्हा दोघात मीच अधिक काळजी घेणारा होतो. पण दलजितला सगळीच गंमत वाटत होती आणि सगळे काही गूढ करायची इच्छा होती.

चवड्यांवर हळूच चालणे दलजितच्या प्रांतातलेच नव्हेच. त्याची पावले मोठी होती आणि त्यामुळे त्याची अनेकदा चेष्टाही होत असे. पंजाबमधे एक म्हण होती: तुमची पावले मोठी असली तर तुम्ही खूप प्रवास कराल. आणि आपलेच म्हणणे खरे करून दाखवायला तो आता सिद्ध झाला होता.

मोठे मोठे पावसाळी ढग वरती जमा होत असताना आम्ही काहीही आवाज न करता दालनासमोरच्या पटांगणातून पळत गेलो. दालनाच्या पायऱ्या उतरल्यावर व्यायामाचे दालन लागले. आम्ही आत शिरलो. हे दार नेहमी उघडेच असायचे. याच दमटपणानं आणि काथ्याच्या वासानं आणि लाकूडकामाच्या रंगरोगणाच्या वासानं कोंदटलेल्या प्रशस्त जागी आमच्या रात्रीच्या बैठका होत असत.

शाळेतून पळून जायच्या आधीची, शेवटची अशी ही आमची बैठक होती.

मेणबत्तीचा तुकडा पेटवून दोघांच्या मध्ये ठेवत दलजित म्हणाला, "तुझी सगळी तयारी झाली ना?"

आम्ही मांड्या घालून एकमेकांसमोर बसलो होतो. मेणबत्तीच्या प्रकाशात दलजितचा गोल, सुस्वभावी चेहरा उजळून निघाला होता. मी छायेत होतो.

"होय, सगळी तयारी आहे," मी म्हणालो. एक सुरी, बिस्किटाचे दोन पुडे, थोडीशी ब्रेड, डबाबंद मासे आणि थोडी मिठाई."

आधीच्या आठवड्यातल्या जेवणाच्या वेळी चोरून खिशात घातलेला पाव आता बराच शिळा आणि कडक झाला होता. पण मला माझी यादी जितकी लांबविता येईल तितकी लांबवायची होती.

"हे तसं पुष्कळ नाही," दलजित म्हणाला. "आणि तुझ्याजवळ पैसे किती आहेत?"

"सहा रुपये. दोन महिन्याचे खाऊचे पैसे."

"रस्टी, हे काही कमी नाहीत." मला खाऊचे म्हणून कमीच पैसे मिळतात हे त्याला माहिती होते. "माझ्याजवळ तीस रुपये आहेत-तेव्हा आपल्याला पैशाची एवढी टंचाई भासणार नाही. निदान सध्यातरी. आणि माझ्याजवळ थोडे चीज, मुरंबा, चॉकलेट आणि लोणचे आहे. माझ्या मागच्या खाऊच्या पुड्यातून वाचवलेले."

"चॉकलेटबरोबर लोणचे?"

"नाही, मुळीच नाही. पण जाताना वाटेत खायला मिळेल त्याच्या बरोबर ते खाता येईल."

दलजितचे वडील पूर्व आफ्रिकेत व्यापारी होते. तेथून ते त्याला अनेकदा खाऊचा डबा पाठवत असत. भारतातल्या निवासी शाळात राहून कंटाळा आल्यामुळे आपण आफ्रिकेत जायचे असा दलजितच्या बेतातला एक भाग होता. यामुळेच आमचे दोघांचे इतके जमले होते. पूर्व आफ्रिकेतले मोंबासा आणि भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरची जामनगर किंवा द्वारका ही छोटी बंदरे यांच्यात अधून मधून फेऱ्या मारणाऱ्या एका लहान गलबताचे माझे काका तांडेल होते. त्यांच्या गलबताचे नाव होते 'एस.एस. ल्युसी' आणि या महिन्यांच्या अखेरीला ते जामनगरला येणार आहे अशी मला बातमी होती. त्या गलबतावर आम्हाला घेऊन जाण्याकरता आम्ही हट्ट धरला तर ते आम्हाला घेऊन जातील अशी आम्हाला आशा होती.

दलजितला आफ्रिकेत जायचे होते. आपले आपण एकटेच परत येऊ शकतो हे पाहिल्यावर आपल्याला आपले वडील पुन्हा भारतातल्या शाळेत ठेवायला धजणार नाहीत अशी त्याची अटकळ होती.

मलाही पळून जायचे होते. पण वेगळ्या कारणामुळे. अर्थातच शाळा हा भाग त्यात होताच. डिकन्सच्या 'डॉथबॉयज् हॉल' इतकी वाईट नसली तरी ती एक निकृष्टच शाळा होती. एक शाळा म्हणून नाही तर एक धंद्याचा भाग म्हणूनच ती मुख्याध्यापक चालवत असत. 'आवळा देऊन कोहळा काढा' हेच त्यांचे तत्त्वज्ञान होते. ते भरमसाट फी घ्यायचे आणि त्याच्या मोबदल्यात वाईट अन्न आणि वाईट शिक्षक द्यायचे. निदान आम्हा मुलांना तरी तसे वाटायचे.

अरुंडेलमधे (होय, ते आमच्या शाळेचे नाव होते) यायला दलजित स्वत:च जबाबदार होता. त्याला अशा अनेक शाळांत पाठविण्यात आले होते पण तो कुठेच रूळला नाही आणि ही नाही, ती नाही असे करत शेवटी इथे येऊन हजर झाला होता. आणि तीन महिन्यात बहुधा फक्त मसुरीच्या वरणाचे पाणी आणि मटनात फक्त चरबी हेच खायला मिळाल्यामुळे त्याला आता इथून जायचे होते.

''ही माझी शेवटची शाळा. बस्स झालं'', त्याने जाहीर केले. ''मी थेट इथून माझ्या वडलांच्या नैरोबीतील धंद्यामध्ये त्यांना मदत करायला जाणार आहे. मला लिहिता वाचता येतं आणि मला नफा तोट्यातला फरक कळतो. तेवढं पुरेसं आहे. तू काय करणारायेस रस्टी?''

''मला लेखक व्हायचंय.'' मी म्हटलं. ''शाळेत जायला माझी फारशी हरकत नाही पण मला ही शाळा आवडत नाही. पण मला माझे पालक दुसरीकडे पाठवायचे नाहीत हेही मला पक्कं माहीत आहे.''

मला आईवडील नव्हते, आणि माझ्या पालकांनी मला अरूंडेलला पाठवले होते कारण त्यांची मुख्याध्यापकांशी मैत्री होती आणि त्यामुळे मला इतरांपेक्षा निम्मीच फी भरावी लागायची. अरूंडेलला येण्याआधी मी मैदानी प्रदेशातील दिवसभराच्या शाळेत होतो. परंतु, मी वयाने वाढू लागलो तेव्हा माझ्याकडे लक्ष द्यायला माझ्या पालकांना फार त्रास वाटू लागला. बंड करण्याकडे माझा कल होता, मला माझा मोकळा वेळ घरात घालवण्यापेक्षा बाजारात घालवायला आवडायचे आणि जंगली प्राणी मारायच्या त्यांच्या दांडगट शौकाऐवजी मला पुस्तके वाचायला आवडायची. माझे पालक माझ्या आईचे काहीतरी मामे किंवा चुलत भाऊ होते आणि त्यांच्याविषयी मला कधीच आस्था वाटली नाही आणि तेही माझ्या बाबतीत निराश झाले होते.

तथापि पळून जायचे मुख्य कारण म्हणजे मला पुन्हा बाजारात जायला लागायचे होते किंवा पालकांच्या घरी जायचे होते हे नसून जामनगरमधे असलेल्या काकांच्या गलबतावर पोचायचे हे होते.

जिमकाका म्हणजे माझ्या वडलांचे धाकटे भाऊ. मी पाच वर्षांचा छोटा मुलगा असताना त्यांनी मला शेवटचे पाहिले होते आणि आता मी बारा वर्षांचा होतो. इतक्या वर्षांत अधूनमधूनच पण तरी नेह्मी जिमकाका मला पत्र लिहीत असत. आणि त्यांची पत्रे निरनिराळ्या देशांच्या चित्रविचित्र रंगांच्या तिकिटांमुळे गमतीदार वाटायची. वालपाराइसो, सॅन दिएगो, सॅन फ्रॅन्सिको, ब्वेनस एअरीझ, दारेसालाम, मोंबासा, फ्रीटाऊन, सिंगापूर, मुंबई, मार्सेय्य, लंडन-जिमकाकांचे गलबत जिथे थांबायचे त्यापैकी काही बंदरांची ही नावे. ते एकाच मार्गावरून पुन्हा पुन्हा कधीच जायचे नाहीत. ते अगदी आरामात वेगवेगळ्या स्थळांना भेट देत सगळ्याच समुद्रांवरून फिरले असे मला वाटायचे. आणि या स्थळांबाबत मला कमालीचे औत्सुक्य होते. कारण मी स्टिव्हन्सन, कॅप्टन मॅरीयॅट, थोडासा कॉन्राड, आणि डब्ल्यू. डब्ल्यू. जेकब्स यांची या स्थळांबद्दल माहिती देणारी पुस्तके केव्हाच वाचली होती.

आपल्या पत्रांतून जिमकाका नेह्मीच मला आपण जोडीने समुद्रावरून हिंडूफिरू असे लिहायचे आणि म्हणायचे, "पण रस्टी, तू अजून थोडा मोठा व्हायला हवास."

माझ्या कल्पनेप्रमाणे मी आता पुरेसा मोठा झालो होतो. शाळा आणि माझे पालक यांच्याबद्दल मला पूर्ण तिटकारा वाटू लागला होता. पण तेवढेच नाही. मी साऱ्या जगाच्याच प्रेमात पडलो होतो. मला ते सगळे पाहायचे होते. त्याच्या प्रत्येक कानाकोपऱ्यात जायचे होते, मी पुस्तकात वाचलेली सारी ठिकाणे-हाँगकाँगच्या शिडाच्या चिनी नावा, लक्षद्वीप बेटातील पामच्या झावळ्यांनी झिरमिळीत केलेला तेथला समुद्र, लंडनमधले रस्ते, आफ्रिकेतली काळ्या चकाकत्या कातडीची सुंदर माणसे, अमेझॉनमधील पक्ष्यांचे झगझगीत रंग आणि विलक्षण झाडे...

जिमकाकांच्या आलेल्या पत्रात महिन्याच्या शेवटी शेवटी आपले जहाज जामनगरला कसे पोचणार आहे हे मी वाचले तेव्हा माझे मन अपेक्षेने आणि उत्साहाने ऊतू जाऊ लागले. हीच संधी होती. मला त्यांच्याबरोबर नेण्याबद्दल जिमकाकांनी काही लिहिले नव्हते हे खरे. परंतु मी किती मनापासून तो बेत आखला होता हे त्यांना माहितीच नव्हते.

शाळेतून बाहेर पडायचे आणि कुठल्यातरी गाडीतून पटदिशी बंदराच्या

धक्क्यावर पोचायचे असा तो प्रकार नव्हता. माझी शाळा उत्तर भारतातल्या पहाडगंज या थंड हवेच्या ठिकाणी होती आणि पश्चिम किनाऱ्यावरचे जामनगर तेथून जवळ जवळ आठशे मैल दूर होते.

आठशे मैल!



# चांदण्यातले खलबत

मला साथ द्यायचे दलजितने कबूल केले नसते तर मी हा प्रयत्न केला असता की नाही याबद्दल शंकाच आहे. एकट्याने, स्वत:च्या स्वत:वर अवलंबून राहून असा प्रयत्न करणे म्हणजे काही गंमत नव्हती. सुरवातीला अगदी उत्साह दाखवणारा आणि शेवटच्या क्षणी माघार घेणारा साथी मिळणे तर त्याहूनही वाईट. कारण त्यामुळे पराभूत वाटते आणि आपले मन पुरते खचते. पण दलजित तशा प्रकारचा साथी नव्हता. जे बोलू ते खरोखर करून दाखवणाऱ्यांपैकी तो एक होता. साधारण महिन्यापूर्वी काकांच्या जहाजाबद्दल त्याला सांगून तिच्यात बसून आपणही जावे असे वाटते असे मी म्हणालो तेव्हा एका क्षणाचाही विलंब न लावता तो म्हणाला होता: ''मी पण तुझ्याबरोबर येईन.''

दलजित मनस्वी होता. काही वेळा तो चुकाही करायचा. पण अर्धी वाट चालून मध्येच एकदम थांबणाऱ्यापैकी तो नव्हता. कोणीतरी जाऊन त्याला थांबवायला लागायचे. नाहीतर मनात घेतलेली गोष्ट तो शेवटाला न्यायचाच.

पावसाळ्याच्या सुरवातीला होणाऱ्या लांब पल्ल्याच्या धावण्याच्या शर्यतीच्या वेळी आमची मैत्री झाली होती. मी कमी अंतराच्या शर्यतींमधे खूपच चांगला होतो आणि दलजित तसा जाड्या असल्याकारणाने इतर मुलांबरोबर राहणे त्याला जमत नसे. चांगल्या धावपटूंना पुढे जाऊ दिल्यानंतर मी एखाद्या गवताळ टेकाडावर बसत असे आणि एखादे कॉमिक किंवा डेव्हिड कॉपरफील्ड या पुस्तकातले एखादे प्रकरण वाचून काढत असे. एका संध्याकाळी मी शर्यतीचा असा सदुपयोग करत असताना रमतगमत आणि गमतीने शीळ घालत येणारा दलजित मला दिसला.

''तू शर्यतीत नाहीस?'' मी विचारले.

''आहे ना. तू?''

''मीही आहे,'' मी म्हटले आणि मी पुन्हा हातातल्या पुस्तकाकडे वळलो. दलजित माझ्या शेजारी बसला.

"आपल्याला थोडा उशीर झाला तरी त्यांना काही कळणार नाही." तो म्हणाला.

"त्या पलीकडच्या रस्त्यावरच्या छोट्या हॉटेलात जाऊन गरम भजी खाण्याबद्दल तुझं काय मत आहे? पैशाची तू काळजी करू नकोस. माझ्याजवळ पुष्कळ आहेत. माझे लाड करण्यापासून मी काही माझ्या आईला परावृत्त करू शकत नाही."

एका दीर्घकाळ टिकणाऱ्या मैत्रीची ती सुरवात होती.

भजी आणि दोघांनाही असणारा लांब पल्ल्याच्या शर्यतीबद्दलचा अनुत्साह यावर तिची सुरवात झाली असली तरी ती लवकरच भक्कम पायावर उभारली गेली. लांब पल्ल्याच्या अनेक शर्यतीत साथ दिल्यानंतर आपण कित्येक वर्षांपासून एकमेकाला ओळखतोय असे आम्हाला वाटू लागले.

आता अंधारात आणि उंच छपराच्या व्यायामशाळेत शेजारी शेजारी बसलो असताना आपण एकमेकाला पूर्णपणे ओळखतोय अशी भावना होती. दलजितजवळ अधिक पैसे आहेत याचे मला वैषम्य वाटत नव्हते. मी त्याच्याहून अधिक 'चलाख' आहे असे तो म्हणायचा आणि त्याचे त्यालाही काही वाटायचे नाही. माझ्या वाचनाच्या आवाक्याबद्दल त्याला मनापासून आदर होता. पण मी व्यवहारात कमी पडायचो आणि जगाच्या व्यवहारात दलजित अधिक तरबेज होता.

त्याने पायजम्याच्या खिशातून कागदाचे एक भेंडोळे बाहेर काढले, फरशीवर पसरले. तो भारतातल्या आगगाड्यांच्या मार्गांचा नकाशा होता. आम्ही तो आमच्या अखेरच्या लांबपल्ल्याच्या शर्यतीच्या वेळी खरेदी केला होता. आमची शेवटची शर्यत म्हणजे खरोखरच लक्षात राहावी अशी होती. शर्यतीचा मार्ग सोडून आम्ही बाजारात गेलो आणि बऱ्याच गोष्टी खरेदी केल्या आणि मग जवळचा मार्ग शोधून आम्ही शाळेत पोचलो. आणि शर्यतीत आम्ही दोघेच पहिले आणि दुसरे! (नंतर, परीक्षक परत आल्यावर, आम्हाला अर्थातच बाद करण्यात आले. कारण शर्यतीच्या ठरवलेल्या मार्गावर आम्ही यांना कोठेही पाहिलेले नाही असा त्यांनी ठामपणे दावा केला. तथापि आम्हाला थोडे का होईना पण मानाचे क्षण मिळाले होते आणि तेव्हा सगळ्यांनी विजयाबद्दल आमची पाठ थोपटली होती!)

आमच्यासमोर नकाशा पसरल्यावर मी लाल पेन्सिल घेतली आणि हिमालयाच्या पायथ्याशी असलेल्या पहाडगंजभोवती वर्तुळ काढले. मग कच्छच्या आखाताच्या समोर असणाऱ्या, काठेवाडच्या द्वीपकल्पाच्या टोकाला असलेल्या जामनगरभोवती वर्तुळ काढले. या दोहोंच्या मध्ये काय होते? पहिल्यांदा टेकड्या आणि जंगले. मग सपाट आणि सुपीक गंगे-यमुनेचे दिल्लीपासूनही थोड्या पुढेपर्यंत पसरलेले खोरे,

मग, उजाड, रखरखीत, तांबडट टेकड्या आणि वाळूच्या टेकड्या असलेले राजस्थानचे वाळवंट आणि शेवटी गुजरात व महाराष्ट्र यांचा सुपीक किनारी प्रदेश. मध्ये नद्या आणि सरोवरे होती. ज्या मिळतील त्या सर्व वाहनांचा उपयोग करून हा प्रवास करायला हवा होता कारण आमच्या जवळ वेळ कमी होता. जिमकाकांचे गलबत आवश्यक असेल तेवढाच वेळ बंदरात राहणार. जुलैच्या शेवटाला, म्हणजे पावसाळ्याचा फारच मोठा त्रास होण्याआधी ते पुन्हा प्रवासाला निघणार होते.

"जितक्या लवकर शक्य आहे तितक्या लवकर आपण दिल्ली गाठायला हवी," मी म्हणालो. "नाहीतर आपण सहजगत्या सापडू शकू. एकदा दिल्ली मागे टाकली की आपल्याला कुठं शोधायचे ते त्यांना कळणार नाही. भारत फार मोठा आहे. त्यात हरवून जाणं सहज शक्य आहे."

"आपल्याला शोधायचा एवढा त्रास ते घेतील असं तुला वाटतं?"

"नक्कीच. माझे पालक मुख्याध्यापकांचे मित्र आहेत हे तुझ्या लक्षात आहे ना? आणि तुला काही झालं तर तुझे वडील शाळेला कोर्टात खेचतील. आपण दिसत नाही म्हटल्याबरोबर ते लागलीच पहाडगंजमधे शोधायला सुरवात करतील. आणि इथं किंवा डेहरामधे आपण आढळलो नाही तर ते पोलिसांना कळवतील आणि गुन्हेगारांप्रमाणे आपणही 'पाहिजे आहेत' च्या यादीत जाऊ. आगगाडीची स्टेशनं आणि बसचे थांबे इथं पाळत राहील."

"म्हणजे आपण चालत दिल्ली गाठायची असं तुझं म्हणणं आहे की काय?" भयचकित होऊन दलजित म्हणाला. "मला नाही जमणार सव्वाशे मैल चालणं."

"आपण फक्त डेहरापर्यंत चालत जाऊ या. ते बारा मैल आहे आणि रस्ता उताराचा आहे. तुला तेवढं तर जमेल ना?"

"जमेल असं वाटतं. म्हणजे सगळा रस्ता उताराचा असला तर."

"डेहरापासून आपल्याला आगगाडी, बस किंवा ट्रक पकडायला हवी. आगगाडीची स्टेशनं आपल्याला टाळायला हवीत."

"ठीक आहे, रस्टी. एवढं बस्स. फार पुढच्या गोष्टींची आपण आखणी करायला नको. प्रथम दिल्लीला कसं पोचता येईल हेच आपण पाहू या. तेच आधी फार लांब आहे. त्याच्यानंतर आपण जसं जमेल ते करू या."

आम्ही आपापल्या विचारात बुडून गेलो. आपण सापडलो तर त्याचे काय काय परिणाम होतील आणि वाटेत कोणते अडथळे आणि धोके असतील याबद्दलचे विचार. मेणबत्ती फडफडली आणि विझली. काही क्षण तेथे पूर्ण अंधार होता. मग एक बारीक प्रकाश किरण आजूबाजूला आणि माझ्या पायांवर पडला.

''माझा पेन्सिल टॉर्च तुला कसा वाटतो?'' दलजितने विचारले. ''जेम्स बाँडच्या कल्पनेनुसार जपानमधे बनवलेला. मी तो गेल्या वर्षी नैरोबीला विकत घेतला. पण आपण बॅटरी अशी खर्च करणं बरोबर नाही; या आकाराच्या सेल्स येथे मिळत नाहीत.'' त्याने विजेरी बंद केली.

''घरी तुझे नको इतके लाड होत असले पाहिजेत,'' मी म्हणालो.

''खरं आहे.'' दलजित खूष होत म्हणाला. ''मी पुरता बिघडलो आहे.'' त्याने माझ्या हातात आपला हात दिला. ''मग उद्या नक्की,'' तो कुजबुजला. खरे तर असे कुजबुजायचे काही कारण नव्हते. पण प्रत्येक गोष्ट नाट्यमय करायची दलजितला सवयच होती.

''होय, उद्या रात्री,'' मी म्हटले.

''आपण कुठं भेटायचं?''

''खाली देवदाराच्या जंगलात. मोठ्या खडकाजवळ. दहा वाजता. तेथून आपण ओढ्याच्या काठाकाठानं जाऊ. डेहराची घोडेवाट येईपर्यंत.''

''बरोबर वेळ पाळ हं.'' दलजित म्हणाला. ''ऐन जंगलात अंधारात तुझी वाट पाहायला मला लावू नकोस. ते भुता खेतांनी झपाटलेलं आहे म्हणतात.''

''तुझ्याजवळ तुझी विजेरी आहे की! मी म्हटले.''

त्याने पुन्हा माझा हात घट्ट पकडला. ''उद्या शाळेत आपण एकमेकाशी एक अक्षरही बोलायचं नाही. कोणालाही संशय येऊ द्यायचा नाही. आता आपण झोपायला जाऊ या. मला झोप आलीय.''

''भरपूर झोपून घे,'' मी म्हटले. ''उद्यापासून आपल्याला फारशी झोप मिळणार नाही.''

आम्ही तालमीतून बाहेर पडलो तेव्हा चंद्र पुरा वर निघाला होता. मैदान, मुख्य दालन आणि शयनगृहाची इमारत स्पष्टपणे दिसत होती. देवदार वृक्षांच्या भीतीदायक सावल्या टेकडीवर पडल्या होत्या. वरती आकाशात काही ढगांची भटकंती चाललेली होती. ती एक अप्रतिम रात्र होती.

''आपण कोणाला दिसलो नाही म्हणजे मिळवली,'' दलजित म्हणाला.

''तुला पकडलं तर तू सांग की मी झोपेत चालतोय असं तुला दिसलं. तेव्हा माझ्यावर नजर ठेवण्यासाठी म्हणून तू गुपचूप माझ्या पाठोपाठ आलास.''

''ही छान कल्पना आहे. तुझ्या वाचनामुळे तुला इतक्या चांगल्या कल्पना सुचत असल्या पाहिजेत.''

एखाद्या प्रेतभक्षक राक्षसांच्या जोडीप्रमाणे आम्ही दोघे मधल्या मैदानावरून चटकन गेलो आणि घाईघाईने शयनगृहाच्या जिन्यांवरून वर पळालो. आपल्या

दालनाच्या दाराजवळ येताच दलजितने मागे वळून पाहिले आणि कट पक्का शिजल्याप्रमाणे हात हलवला. मी माझ्या गादीवर हळूच पहुडलो आणि झोपायचा प्रयत्न करू लागलो. पण झोप येईना. आम्ही करू पाहणारे साहस, आम्हाला करावा लागणारा प्रवास आणि आपल्या गलबतावर आम्हाला पाहून माझ्या काकांना वाटणारे आश्चर्य याचेच विचार सारखे मनात फेर धरत होते.

आम्ही दोघे अर्थातच बोटीवर काम करून तिकिटाच्या पैशाची भरपाई करणार होतो. मी आणि दलजित बोटीवरचे सफाई कामगार होऊ शकलो असतो.

याकोहामा, वालपाराइसो, सॅन दिएगो, लंडन!



# धाब्यावरील चहापान

शाळेतून पलायन. प्रत्येकाला शिफारस करावी अशी ही गोष्ट नाही. या नुसत्या विचारानेच आईवडील आणि शिक्षकांच्या कपाळावर आठ्या पडतील. हे खरेच की त्यांच्या मनात खोल कुठेतरी ?.. आपण पळून जावे असे आयुष्यातल्या कोणत्या ना कोणत्या क्षणी प्रत्येकालाच वाटते. वाईट शाळा किंवा घरातली अप्रसन्नता हीच कारणं असतील असं नाही. पलायनाला तर चांगलीच दांडगी परंपरा असल्यासारखे दिसते. हक फिनने ते केले होते. त्याचप्रमाणे डेव्हीड कॉपरफील्डने आणि ऑलिव्हर ट्विस्टने; किमनेही तेच केले. अनेक हरहुन्नरी माणसे समुद्रावर पळून गेलेली आहेत. सगळ्या थोर माणसांनी आपल्या आयुष्यात केव्हा ना केव्हातरी शाळेतून पलायन केलेले आहे. आणि तसे नसेल तर त्यांनी तसे करून पहायला हवे होते.

काही का असेना मी आणि दलजित शाळेतून पळालो आणि त्याच्या पाठीमागची कारणे सांगत आता वेळ घालवण्यात काहीच हशील नाही. आणि काही अंशी आम्ही त्यात यशस्वीही झालो. तथापि हे सगळे भारतात घडले. आणि भारताची जमीन जगात दोन टक्के असली तरी तिथली लोकसंख्या जगाच्या पंधरा टक्के आहे. आणि त्यामुळे गुप्त व्हायला किंवा लपायला, किंवा नाहीसे होऊन पुन्हा कधीही दृष्टीस न पडायला भारत देश सहजसोपा आहे.

म्हणजे आपण नाहीसे व्हायचे असा आमचा बेत नव्हता. आम्ही एका विवक्षित ठिकाणाकडे–जामनगरकडे निघालो होतो. आणि शाळेच्या खालच्या निसरड्या देवदाराच्या सुयांवर मी पहिले पाऊल टाकले–अज्ञातातली ती पहिलीच पायरी असली–तरी मी कशापासूनही पळून जात नव्हतो तर कशाकडेतरी पळत जात आहे अशी माझी खात्री होती. हवे तर त्याला स्वप्न म्हणा. मी एका स्वप्नाकडे धावत जात होतो.

अनवाणी पायांनी आणि नेहमीच्या पायजम्यामध्ये मी टेकडीच्या खड्या

उतारावरून खाली सरकत गेलो आणि जंगलाच्या मध्यभागी असलेल्या सपाट खडकावर पहिल्याने पोचलो. पाइन वृक्षांमधून मऊ वारा जांभई देत होता. ती एक सुरेख आणि थंड रात्र होती. एखाद्या माणसाने स्वत:शीच पण स्वरताल सोडून गुणगुणावे असा खालच्या घळीतून गुंजारव करत जाणाऱ्या ओढ्याचा अस्पष्ट आवाज ऐकू येत होता. दाटलेल्या पावसाळी ढगांआडून पूर्ण चंद्र बाहेर आला आणि आजूबाजूच्या अंधारातून झाडेझुडुपे आणि खडक प्रकट झाले.

काही मिनिटांनी दलजित हजर झाला. तो पायजम्यातच होता पण त्याने त्याचा फेटा मात्र बांधला होता. साधारणपणे सर्व शिखांना असतो त्याप्रमाणे दलजितला स्वत:च्या फेट्याचा फार आदर होता. तो फेटा फक्त रात्रीच उतरवून ठेवत असे. किंवा खेळांच्या वेळी. आणि फेट्याशिवाय बोडक्या माथ्याने पळून जावे अशी त्याला कल्पनाही करता आली नसती. झोपायच्या वेळी त्याने तो न उलगडता तसाच बांधलेला उतरवून ठेवला होता आणि गादीवरून उठल्यावर एखाद्या टोपीप्रमाणे नीटपणे, त्याची एकही चुणी न विसकटता डोक्यावर चढवला होता.

आम्ही आमचे व्यायामाचे कपडे बोचक्यात बांधून घेऊन आलो होतो. पुढे निघण्याअगोदर आधीचे कपडे काढून आम्ही त्या बोचक्यातले कपडे चढवले कारण शाळेच्या कपड्यात आम्हाला कोणीही पट्दिशी ओळखू शकले असते. आणि आमचे घरचे कपडे शाळेच्या सामानाच्या खोलीत रात्र संपायची वाट पाहात बंद होते. आम्ही आमचे तालमीचे जोडेही चढवले. आमच्या पाठीवरील पिशव्या खाद्यपदार्थांनी भरल्या होत्या. त्यातच पायजमा आणि चारदोन पुस्तके होती. आमचे बहुतेक सामान-आमचे कपडे, गाद्या, पांघरूणे आणि पेट्या आम्ही आनंदाने मागेच सोडून चाललो होतो.

टेकडीच्या पायथ्याशी नेणारी एक अरूंदशी पायवाट होती. आणि ती मैदानात उतरेपर्यंत आम्ही तिनेच खाली उतरलो. पायवाटेला समांतर वाहणारा, खळखळाट करत पर्वतावरून उतरणारा छोटा ओढा होता. आम्ही त्या ओढ्याच्या काठाकाठाने भराभर आणि काहीही न बोलता मैलभर गेलो. तेथे आम्हाला घोडेवाट दिसली. ती खेचरवाटेपेक्षा किंचित रूंद असेल नसेल. त्या वाटेला खोल उतार होता. आणि शेवटच्या टेकड्यावरून ती थेट दरीत पोचत होती.

खाली उतरणे तसे सोपे होते. आम्हाला रस्ता पाठ होता. आणि आम्ही शेवटच्या तळ-टेकड्यावर पोचलो तेव्हा पावसाला सुरवात झाली. पण जोरात नाही. एखादी झिरमीर बारकीशी सर यावी त्याप्रमाणे.

एका खेडेगावच्या वेशीवरल्या छोट्या धाब्याच्या निवाऱ्याला थांबलो आम्ही. धाब्याचा मालक अजूनही झोपलेलाच होता. एकच कान असलेल्या त्याच्या गावठी



कुत्र्याने आमच्या अंगावर येण्याऐवजी मित्रत्वाने आमचा वास घेतला. आम्ही तेथल्या जुन्या बाकड्यावर बसलो. आणि दूर वरच्या पर्वतांमागून सूर्य उगवताना पाहिला.

तो सूर्योदय माझ्या आठवणीत कायमचा कोरला गेला आहे.

दुसऱ्या कोठल्याही दिवसापेक्षा तो अधिक सुंदर होता म्हणून नाही तर त्या विशेष महत्वाच्या सकाळपासून सगळीकडे पाहायची माझी दृष्टीच बदलून गेली म्हणून. त्यावेळच्या क्षुल्लक गोष्टीसुद्धा मला अगदी स्पष्टपणे आठवतात.

आकाश थोडे मोकळे होऊन उजाडल्यावर उंच गेलेले देवदाराचे वृक्ष क्षितिजावर उभरून आले, आणि पक्ष्यांनाही जाग आली. एका कोकिळेने हलकेच मंजुळ स्वरात गायला सुरवात केली. आणि मग सारिकांनी झाडाझुडुपात चिवचिवाट सुरू केला. वेडा राघू सदाहरित राहणाऱ्या देवदाराच्या झाडाच्या टोकावरून एकसुरी

तानेत किंचाळू लागला. आकाश अधिकच उजळले तेव्हा चकचकीत हिरव्यागार पोपटांचा थवा फार उंचीवर न जाता झाडांवरून उडू लागला. पावसाची सर तशी बारीक, अगदीच किरकोळ होती. आणि पूर्वेला चकाकणारा, किरमिजी तांबडट रंगाचा उजाळा होता. आणि नंतर, अगदी अचानकपणे ढगांच्या फटीतून घुसून सूर्यकिरण पुढे आले. आजुबाजूची पावसाळी हिरवी गार कुरणे लख्खकन नजरेत भरली. मी आणि दलजित या दृश्याच्या अद्‌भुततेने चकित झालो. एवढ्या दिवसात आम्ही कधीही इतक्या लवकर उठलो नव्हतो. सहसा लक्षात न येणारी झाडे झुडुपे आणि गवत यात विणलेली कोळ्यांची जाळी लख्खकन दिसत होती आणि त्यांच्यावर सोनेरी आणि चंदेरी पावसाचे थेंब चमचमत होते. त्या जाळ्यांचे चिवट रेशमी धागे पावसाच्या सरीतही टिकून होते आणि त्यांवरील पावसाच्या प्रत्येक थेंबाचे इवल्याश्या रत्नात रूपांतर करीत होते. पावसामुळे भिजून जड झालेल्या आपल्या शेंदरी फुलांनी लदलेल्या रानटी ढालियांनी टेकडीची एक बाजू व्यापली होती आणि पांचूसारखा हिरवा नाकतोडा सूर्यप्रकाशात आपले पाय फाकून एका पाकळीवर आरामात पसरला होता.

धाबेवाला आता उठला होता. मालकाच्या उपस्थितीमुळे अधिक धीट झालेला त्याचा कुत्रा आता आमच्यावर भुंकू लागला. धाबेवाल्याने चुलीमध्ये कोळसा पेटवला आणि त्याच्यावर पाणी उकळायला किटली ठेवली.

''तुम्हाला काही खायला हवे का?'' त्याने गप्पिष्टपणे हिंदीत विचारले.

''नको, आम्हाला फक्त चहाच हवा,'' मी म्हटले.

त्याने पितळेचे दोन पेले टेबलावर ठेवले.

''अजून दूध आलेले नाही,'' तो म्हणाला. ''तुम्ही फार लवकर आलाहात.''

''आम्ही दुधाशिवायच चहा घेऊ,'' दलजित म्हणाला. ''पण आम्हाला भरपूर साखर द्या.''

''हल्ली साखर फार महाग झालीय. पण तुम्ही शाळकरी मुलं आहात आणि तुम्हाला जास्त हवीय तर घ्या तुम्हाला हवी तेवढी.''

''अहो, पण आम्ही शाळकरी मुलं नाही आहोत.'' मी घाईघाईने म्हटले.

''मुळीच नाही आहोत,'' दलजित म्हणाला.

''आम्ही पर्यटक आहोत,'' मी माहिती पुरवली.

''आम्हाला डेहरात लवकरची आगगाडी पकडायची आहे,'' दलजित म्हणाला.

''पण दहाच्या आत तिथं गाडीच नाही,'' आश्चर्याने धाबेवाला म्हणाला.

"आम्हाला दहाचीच गाडी पकडायची आहे," दलजित हुशारीने म्हणाला. "तुम्हाला वाटतं आम्ही तिथं वेळेवर पोचू म्हणून?"

"सहज. दहाला अजून पुष्कळ वेळ आहे."

धाबेवाल्याने गरम चहा पेल्यात ओतला आणि साखरेचा डबा आमच्यापुढे ठेवला.

"सुरवातीला मला वाटलं तुम्ही शाळेतलीच मुलं आहात," तो हसत म्हणाला. " मला वाटलं तुम्ही पळून जाताहात."

दलजित थोडासा निराशेनेच हसला. निदान मला तरी तसे वाटले.

"तुम्हाला तसं का वाटलं?" त्याने विचारले.

"का काय सांगणार? मी इथं कित्येक वर्षं आहे." जणू जंगली प्रदेशातील व्यापाराचे शेवटचे ठाणे असावे त्याप्रमाणे त्याच्या लाकडी दुकानाच्या आसपासच्या छोट्याशा मोकळ्या जागेकडे हात करत तो म्हणाला. "पळून जाणारी शाळकरी मुलं नेहमीच या रस्त्यानं जातात."

"खूप मुलं पळून जातात का हो?" मी विचारले.

"फार नाहीत. वर्षामधे साधारण दोन किंवा तीन. ती फार फार तर डेहरातल्या आगगाडीच्या स्टेशनापर्यंत पोचतात आणि तिथेच सापडतात."

"असं सापडणं म्हणजे निव्वळ वेडेपणा आहे." दलजित म्हणाला. "ती नेहमीच सापडतात का?" मी विचारले.

"अगदी नेहमी. मी त्यांना खाली जाताना पेलाभर चहा देतो आणि त्यांच्या शिक्षकांबरोबर परत वर जाताना अजून एकदा वाडगाभर चहा देतो."

"आपली काही पुन्हा भेट होणार नाही," मी केलेल्या धोक्याच्या खुणेकडे दुर्लक्ष करून दलजित म्हणाला.

"पण तुम्ही शाळकरी मुलंच नाही आहात," आमच्याकडं हसून पाहात धाबेवाला म्हणाला. "आणि तुम्ही पळूनही चालला नाही आहात."

आम्ही चहाचे पैसे दिले आणि पुन्हा घाईघाईने आमच्या वाटेला लागलो. पोपटांचा थवा पुन्हा उडाला आणि मोठ्याने चीत्कार करत लीचीच्या झाडावर जाऊन बसला. ऊन आता तापू लागले होते आणि उतारावरून आम्ही खाली येऊ लागलो त्याप्रमाणात हवेतली गरमी आणि दमटपणा वाढू लागला. आणि तळाच्या सपाटीवर असणारी उन्हाची धूप जणू आम्हाला भेटण्यासाठी आता वर येऊ लागलेली आहे असे आम्हाला वासावरून वाटले.

टेकड्या सपाट झाल्या. एखादी ढकलगाडी सहज ढकलत नेता येईल इतपत सपाटीचा प्रदेश आला. तो सगळा शेतांनी व्यापला होता. त्यात भाताची लावणी पुरी

झाली होती आणि ऊस कमरेइतका वाढला होता.

वाटेवर चिखल झाला होता. आमची पादत्राणे काढून ती वर्तमान पत्रात गुंडाळून आम्ही ओल्या चिखलातून अनवाणी जाऊ लागलो.

"आता आपण डेहराच्या परिसरात तीन मैल आलो असू," मी म्हणालो. "आपल्याला गावाला वळसा घालून जायला हवे. एव्हाना शाळेतला प्रत्येकजण जागा झाला असणार आणि आपण पळालो आहोत हे सगळ्यांना कळलेलं असेल."

"आपण स्टेशनवर जाता कामा नये," दलजित म्हणाला.

"आपण पुढच्या गावापर्यंत, म्हणजे रायवालापर्यंत चालत जायला हवं," मी म्हटलं. "आणि तेथील स्थानकावर येणाऱ्या पहिल्या गाडीत शिरायला हवं."

"म्हणजे आपल्याला किती चालावं लागेल?"

"जवळ जवळ दहा मैल."

"दहा मैल?" भयचकित होत दलजित म्हणाला. "म्हणजे आपल्याला तिथं पोचायला संबंध दिवस लागेल."

"हे बघ, आपण इथं थांबू शकत नाही किंवा मोकळेपणाने भटकू शकत नाही. स्टेशनात जाणं धोक्याचं आहे. त्यामुळे आता आपल्याला चालतच राहावं लागेल."

"ठीक आहे, रस्टी. आपण चालत राहू. मला वाटतं शेवट आनंदमय होणाऱ्या, अद्‌भुत गोष्टींचा सुरवातीचाच भाग नेह्मी सर्वात खडतर असतो."



# वाघ आणि बैलगाड्या

एव्हाना शेते संपून जंगलाची वाट लागायला सुरवात झालीच होती. तथापि आगगाडीच्या मार्गाजवळून दूरवर पसरलेले काही ऊसाचे मळे अजूनही दिसत होते.

"आपल्याला अजून किती लांब चालायचंय?" दलजितने विचारले. "रायवाला जंगलाच्या मध्यभागी आहे का?"

"होय, मला तसंच वाटतं. आपण जवळ जवळ चार मैलांचं अंतर कापलं आहे असं मला वाटतं. अजून सहा मैल जायचंय! काही मैल दुसऱ्या काही मैलांपेक्षा अधिक लांब वाटतात ही किती गमतीची गोष्ट आहे, नाही? मला वाटतं, आपण कशाचा विचार करतोय याच्यावर ते अवलंबून असावं. आपले विचार आनंदी असले तर मैल तितके काही लांब वाटत नाहीत."

"मग आपण आनंदी विचार करू या. इथून कुठून जवळची वाट नाही आहे का, रस्टी? तू या जंगलात पूर्वी येऊन गेलाहेस."

"आपण जंगलातली 'जाळलेली वाट' घेऊ या. त्याने आपले तीन चार मैल वाचतील. पण आपल्याला एका छोट्याशा नदीतून पोहत किंवा चालत जावं लागेल. पावसाळ्याला नुकतीच सुरवात झालीय. तेव्हा पाण्याला फार वेग नसेल किंवा ते फार खोलही नसेल."

जंगलाची आग सहजासहजी भराभर पसरू नये म्हणून भरगच्च जंगलात जागोजागी तोड करून वाटा केलेल्या असतात. या वाटांनी माणसे फारशी येजा करत नाहीत. कारण त्या तशा विशिष्ट अशा कोणत्याच ठिकाणी पोचत नाहीत. पण जंगलातले मोठे प्राणी मात्र त्यांचा पुष्कळदा उपयोग करतात.

आम्ही त्या वाटेने साधारण एक मैल गेलो असू तेव्हा आम्हाला वाहणाऱ्या पाण्याचा खळखळाट ऐकू आला. वाट साल वृक्षांच्या जंगलातून बाहेर निघाली आणि छोट्या नदीच्या काठाशी थांबली. नदीवरचा मुख्य पूल मुख्य रस्त्यावर म्हणजे साधारण तीन मैल खाली होता.

"इथं कमरेपेक्षा अधिक खोली कुठंच नाही," मी म्हणालो. "पण पाण्याला वेग आहे आणि दगड निसरडे आहेत."

आम्ही आमचे कपडे काढले आणि सगळे सामान दोन बोचक्यात बांधले. ती बोचकी आम्ही डोक्यावर ठेवली. दलजितचे शरीर व्यायामाने तयार झालेले होते. त्याच्या मांड्या आणि दंड भक्कम होते. मी शिडशिडीत आणि हलका होतो. पण माझ्या हालचाली जलद व्हायच्या.

पायाखालचे दगड निसरडे होते. आम्ही घसरून धडपडलो आणि आमचा एकमेकाला आधार होण्याऐवजी अधिक अडथळाच झाला. आम्ही नदीच्या मध्यभागी कमरेइतक्या पाण्यात थांबलो. आपण पाण्यात वाहून तर जाणार नाही ना या विचाराने पुढे जावे का नाही याचा विचार करू लागलो.

"मला नीट उभंही राहता येत नाही," दलजित म्हणाला. "प्रवाह आता आहे त्यापेक्षा अधिक काही वाईट होणार नाही." मी आशावादीपणे म्हटले. परंतु प्रवाह वेगवान होता आणि माझे गुडघेही लटलटत होते.

दलजितने पुढे जाण्याचा प्रयत्न केला. त्या बरोबर तो एकदम घसरला. आणि पाण्यात पालथा पडला. त्याच्यामुळे मीही पडलो. तो पाण्यात हातपाय मारू लागला, आणि शेवटी माझा आधार घेत एखाद्या व्हेल माशासारखा तोंडाने पाणी उडवत उभा राहिला.

आपण पाण्याबरोबर वाहत जात नाही आहोत हे लक्षात आल्यावर आमची धडपड थंडावली आणि सावकाश सावकाश, काळजी घेत आम्ही पलीकडच्या काठाला पोचलो. तथापि आम्ही जवळ जवळ पंधरावीस पावलं खाली घसरलोच होतो.

आम्ही गरम वाळूत विश्रांती घेतली. सूर्य चांगलाच तापला होता. दलजितच्या हाताला कापले होते. ते त्याने तोंडात घालून चोखले. थोड्याच वेळात आम्ही उठलो आणि चालू लागलो. भूक लागल्यामुळे आम्ही आता बिस्किटे चघळू लागलो होतो.

"आपल्याला आता फार वेळ चालावं नाही लागणार," मी म्हणालो.

"मला त्याबद्दल विचार करायचा नाही," दलजित म्हणाला. जंगलाच्या वाटेवरून आम्हाला आमचे पाय नेत होते. आम्ही थकलो होतो पण निराश झालो नव्हतो. पुढं एक वळण होते.

आणि अचानकपणे समोर बघतो तो एक वाघ! समोर म्हणजे अगदी जवळ नाही. वाघ आमच्या पासून जवळ जवळ काही पावलांवर आणि रस्त्याच्या बरोब्बर मध्यभागी होता. त्याला पाहून आम्ही जितके चकित झालो तितकाच बहुधा तोही आम्हाला पाहून झाला म्हणा. त्याने त्याचे मोठे डोके उचलले, आपली लांब शेपटी

इकडे तिकडे हलवली पण आमच्या दिशेने काही हालचाल केली नाही. आम्ही रस्त्याच्या मध्यभागी अगदी निश्चल उभे होतो. आम्ही इतके घाबरलो आणि आश्चर्यचकित झालो होतो की आपण काही करायला हवे हे आम्हाला सुचलेच नाही आणि तेही योग्यच झाले होते. कारण आम्ही पळालो किंवा ओरडलो असतो तर आपल्यावर काही संकट आहे असे वाटून वाघाने आमच्यावर हल्ला केला असता. पण हा वाघ माणसांना घाबरणारा नव्हता की नरभक्षकही नव्हता. तो हळू आवाजात गुरगुरला आणि एक क्षणभर थबकून जंगलात निघून गेला.

आम्हाला पुन्हा आवाज फुटले तेव्हा दलजित घोगऱ्या आवाजात कुजबुजला, "इथं वाघ असतील हे तू मला सांगितलं नव्हतंस."

"माझ्या ते लक्षातच आलं नाही," मी म्हणालो आणि ते खरेही होते. "इथं अजून काही वाघ असतील..."

"मला एकच पुरेसा आहे," दलजित म्हणाला. "आपण आता पुढं जायचं का मागं फिरायचं?"

"पुढं जायचं. नाहीतर आपल्याला पुन्हा नदीत धडपडावं लागेल. वाघाला आपल्याबद्दल काहीही औत्सुक्य नाही."

"मग पुढं तर पुढं," दलजित म्हणाला आणि आम्ही त्या गवत जळलेल्या रस्त्याने जाऊ लागलो आणि आम्हाला दुसरी काही जनावरे दिसली नाहीत. म्हणजे आम्हाला येताना पाहून पंख पसरून फडफडत दुसरीकडे जाणाऱ्या मोरांचा अपवाद वगळता.

लवकरच आम्ही पुन्हा मुख्य रस्त्याला लागलो आणि आमच्या दोन्ही बाजूला शेते आणि गावे दिसू लागली. मोकळ्या सपाटीवर टेकड्यांवरचा थंड वारा येत होता. त्यामुळे आजुबाजूचा ऊसही सळसळत होता. मग वारा रस्त्यावरून वाहू लागला आणि आमच्या भोवती धूळ उडू लागली, चक्राऊ लागली. त्या धुळीच्या आवरणातच आमच्या पाठीमागून गाडीच्या चाकांचा आवाज ऐकू येऊ लागला.

"है, है- हिया हिया," गाडीवान ओरडत होता. बैल फुत्कारत होते आणि डुरकत ते धुराळ्यातून प्रकट झाले. आम्ही रस्त्याच्या एका बाजूला झालो.

"तुम्ही रायवालाला जाताय का?" दलजितने जोरात विचारले. "तुमच्या बरोबर आम्हाला नेता का?"

"चढा वर," गाडीवान म्हणाला. आम्ही धुराळ्यातून धावत गेलो आणि चालत्या गाडीत पाठीमागून कसेबसे चढलो.

गाडी गचके देत होती, आवाज करत होती, मध्येच उडत होती आणि आपण खाली पडायला नको म्हणून आम्हाला गाडीच्या बाजूंना घट्ट पकडून बसावे लागत

होते. गाडीला गवताचा, पुदिन्याचा, गायीच्या शेणाच्या गवऱ्यांचा वास येत होता. गाडीवानाच्या डोक्याला लाल फडके बांधलेले होते. अंगात घट्ट कोपरी आणि कमरेला धोतर होते. तो विडी ओढत होता आणि बैलांवर ओरडत होता. आम्हीही गाडीत आहोत हे सुद्धा तो बहुधा विसरला होता. गाडीच्या बाजूंना घट्ट पकडण्यात आम्ही इतके गुंतलो होतो की आम्हाला एकमेकाशी काही बोलायचेही सुचत नव्हते. थोड्याच वेळात रायवालाला येणाऱ्या जाणाऱ्यांची लगबग दिसू लागली. ते एक छोटेसे पण बाजाराचे गाव होते. आम्ही बैलगाडीतून खाली उड्या टाकल्या आणि गाडीच्या बरोबर चालू लागलो.

"आपण त्याला काही पैसे द्यायला हवेत का ?" मी विचारले. "नाही. त्याचा त्याला राग येईल. तो काही टॅक्सीवाला नाही."

"ठीक आहे. आपण त्याचे नुसते आभार मानू."

आम्ही आमचे आभार मोठ्याने ओरडून मानले. पण गाडीवानाने पाठीमागे वळूनही पाहिले नाही. तो आपला आपल्या बैलांशीच बोलण्याच्या नादात असल्यासारखा वाटला.

"मला भूक लागलीय," दलजित म्हणाला. "काल रात्रीपासून आपण खऱ्या अर्थानं जेवलो नाही आहोत."

"तर मग चल, आपण आता खाऊया," मी म्हटले. आम्ही रायवालाच्या छोट्याशा बाजारातून हिंडलो. आम्ही तेथल्या चहाच्या किंवा हलवायाच्या दुकानांकडं पाहात होतो. अखेरीला आम्हाला सर्वात स्वस्त वाटणारा धाबा दिसला.

तिथल्या पोऱ्याने आमच्या पुढे भात आणि डाळ ठेवली. दलजितने चमचाभर तूप मागवले आणि ते डाळीत टाकले. जेवणाचा दर दोन रुपये होता. डाळ हवी तितकी घेता येत होती. आणि आम्ही दोघांनी मिळून ती चार वाट्या तरी फस्त केली.

"आपण स्टेशनवरच विश्रांती घेऊया," धाब्यातून बाहेर पडत असताना मी म्हटले. "आपण दुसऱ्या वर्गाची तिकिटे काढू आणि पहिल्या वर्गाच्या विश्रांतीस्थानात विश्रांती घेऊ. कोणीही आपल्याला काही विचारणार नाही. आपण पहिल्या वर्गाचेच वाटतोय, नाही का ?"

"त्या जंगलातल्या वाटेने चालल्यापासून नाही," दलजित म्हणाला.

पण आम्ही सर्वात चांगल्या विश्रांतीस्थानातच शिरलो आणि दलजित तेथल्या आरामखुर्चीवर पहुडला.

"गाडी यायच्यावेळी मला उठव," तो झोपाळून म्हणाला. आम्हाला फार वेळ वाट पाहावी लागली नाही. मी दाराला टेकून आगगाडीच्या रूळांकडे पाहात होतो तेव्हा येणाऱ्या गाडीची शिटी ऐकू आली. गाडी हळू हळू स्टेशनांत आली.

तिचे मोठे 'हिस्सऽऽ' आवाज करणारे इंजिन वाफेचे लोट बाहेर सोडत होते. फलाटावर गाडीकरता थांबलेल्या प्रवाशांची गर्दी होती. गाडी थांबली तसे ते सगळे पुढे सरकले. त्याच वेळी गाडीच्या डब्यांची दारे उघडली आणि आतले प्रवासी भराभर खाली उतरू लागले.

दलजितला झोपेतून उठवायला मला त्याला हलवावे लागले आणि त्या गोंधळात सामील होण्यासाठी आम्ही फलाटावर आलो. बाया, माणसे आणि मुले एकमेकाला ढकलत धडपडत होती. काही वेळ डब्यात कोणीही शिरू शकले नाही की डब्यातून कोणी बाहेरही पडू शकले नाही. आपली सामानाची गाठोडी काहींनी इतरांच्या डोक्यावरून खिडक्यातून आत टाकली. अनेक तरूण खिडकीतून आत शिरले. आधी डोके आत घुसवत आणि मग आत ढकलणाऱ्या पाठीमागच्यांचा आधार घेत. मी आणि दलजित आमचे सामान घट्ट धरून त्या गर्दीच्या गोंधळात सापडलो आणि थोड्याच वेळात आपोआप डब्यात ढकलले गेलो.

एका कोपऱ्यातल्या जागेवर आम्ही स्थिरस्थावर होतो न होतोय तोच गाडी सुटली. एक दोन माणसे अजून दाराच्या किंवा खिडकीला लोंबकळत होती आणि संधी मिळेल त्याप्रमाणे आत शिरण्याचा प्रयत्न करत होती.

मी खिडकीच्या जवळ होतो. गाडीने वेग घेतला आणि आमराया आणि खेडी विजेच्या खांबाबरोबर एकमेकात मिसळू लागली. आता आपण खरोखरच आपल्या मार्गाला लागलो आहोत, गूढ अशा भविष्यात पदार्पण करत आहोत हे माझ्या लक्षात आले. आणि मनाच्या त्या उद्दीपीत अवस्थेत मी दलजितच्या दंडाला पकडून म्हटले.

"आता आपण मुक्कामाकडे निघालो आहोत!"

"ते तर उघडच आहे," तो म्हणाला. या सर्व गोंधळात एक ढब्बू प्रवासी दलजितच्या हॅवर सॅकवर आरामात झोपला होता. दलजित त्याच्या अंगाखालून ती बाहेर काढायचा प्रयत्न करत होता.

पण दलजितला माझ्या म्हणण्याचा अर्थ कळला होता. आणि ती काढण्यात यशस्वी झाल्यावर तो माझ्याकडे पाहून अर्थपूर्ण हसला आणि त्यावेळी त्याचे डोळे चमकले होते.

# थोडक्यात वाचले

जुन्या दिल्ली स्टेशनावर आम्ही अगदी सभ्य माणसांप्रमाणे गाडीतून खाली उतरलो आणि निर्भयतेने बाहेर पडायच्या दाराकडे, तिकिटे घेणाऱ्यांच्या हातात आमची तिकिटे रूबाबाने देण्याच्या सुखद कल्पनेत चालू लागलो. अतिशय गर्दी होती आणि त्यामुळे हालचाल अगदी संथ होती. आणि हेच फार चांगले होते. कारण बाहेर पडायच्या दारापासून जेमतेम वीस फूट दूर असताना तिकिटे घेणाऱ्याशी बोलणारे जैन गुरुजी मला दिसले. जैन गुरुजी आम्हाला गणित शिकवत असत.

अरूंडेलमधल्या शिक्षकात जैन गुरुजी सर्वात सक्षम होते आणि नक्कीच त्यांना आमचा शोध घेण्यासाठी पाठवण्यात आले होते. ते तसे थुलथुलीत होते आणि त्यांना चष्मा होता. पण ते चाणाक्ष होते आणि आम्हाला कुठे आडवायचे हे त्यांना नेमके कळत होते. आम्हाला आता बाहेर पडायच्या दारापासून दूर सटकणे अपरिहार्य होते.

"चल, इथून दूर जाऊ," दलजितला धरत मी हळूच फिस्कारलो.

"का?" जैन गुरुजींना न पाहिल्यामुळे दलजित म्हणाला.

"तुला दिसत नाही?" मी म्हणालो. "त्या तिकीट घेणाऱ्याच्या तिथं बघ."

तेथून नाहीसे होण्याच्या गडबडीमुळे दलजित आता जवळ जवळ खालीच पडला. सारी गर्दी बाहेर पडायच्या दाराकडे हलत होती आणि माणसांच्या त्या भिंतीतून पलीकडे जायला कुठलीच वाट सापडत नव्हती. नेमक्या त्याच वेळी जैन गुरुजींनी आम्हाला पाहिले आणि ते ओरडले,

"इकडं या! रस्टी! दलजित!"

नेहमीच्या आवाजात दिलेली गुरूजींची आज्ञा पाळावी की काय अशा संभ्रमात मी क्षणभर सापडलो. पण लागलीच मला आमचे वर्ग, शयनगृहे, आणि मुख्याध्यापकांचा काळवंडलेला उंदरासारख्या मिशा असलेला चेहरा आठवला. मी

त्या सगळ्याचा तिरस्कार करत होतो. आणि मला तेथून जमेल तितके लांब जायचे होते. समुद्र आणि त्यावरचे माझ्या काकांचे गलबत दिसेपर्यंत पळत जायचे होते.

दलाजित एक क्षणभरही भांबावला नाही. एका उंच जाट शेतकऱ्याच्या पायामधे तो लागलीच घुसला आणि त्यातून पलीकडे जाताना त्याचा फेटा जवळ जवळ निखळूनच पडला. मला दोन धडधाकट पंजाबी स्त्रियांमध्ये थोडीशी जागा दिसली आणि मी तिच्यात घुसलो. तथापि मी पुरा बाहेर पडण्याआधीच त्या पुन्हा एकमेकांजवळ आल्या आणि हात, तंगड्या यांच्यात एकच अडका अडकी झाली. जैन गुरूजी माझ्या पाठीशीच होते. आणि तेवढ्यात डब्यात शिरायच्या घाईत असलेल्या एका हमालाने एक मुसंडी मारली आणि त्याची जैन गुरूजीशी टकराटकरी झाली.

जैन गुरूजी खाली पडले आणि त्याबरोबर त्यांचा चष्माही. मी स्वत:ला त्या बायकांपासून सोडवून घेतले आणि दलजितच्या दिशेने पळू लागलो. हाताच्या मुठी आणि कोपरे यांचा जोराने उपयोग करत त्याने गर्दीतून मार्ग काढला होता.

तो एकदाच थांबला आणि मी अजून मोकळा आहे की नाही हे त्याने वळून पाहिले आणि ओरडला: ''चल, चल रस्टी! गाडीच्या रूळांपलीकडे.''

त्याने फलाटावरून खाली उडी मारली आणि एका थांबलेल्या गाडीच्या दोन डब्यामधून तो पलीकडे गेला. मी अनिच्छेने त्याच्या पाठोपाठ गेलो. आगगाडीचे मार्ग ओलांडायची मला नेहमीच भीती होती. आणि मला भयाण स्वप्ने पडायची. त्यात मी असह्य होऊन (पण न बांधलेला) आगगाडीच्या रूळांवर पडलेला असायचो आणि एक वाफेचे इंजिन धाडधाड करत माझ्याकडे वेगाने येत असायचे. ते इंजिन माझ्यापासून जवळ जवळ तीन फूट अंतरावर असताना मी नेहमी जागा व्हायचो. परंतु काही काही वेळी आपण शेवटच्या क्षणी जागे नाही झालो तर काय होईल असे मला वाटायचे!

दलजितने एव्हाना दोन आगगाड्यांचे रूळ ओलांडले होते. तो त्या पलिकडच्या कठड्याला धरून वर चढण्याच्या खटपटीत होता. मी डावीकडे पाहिले, मग उजवीकडे आणि पुन्हा डावीकडे. तिकडे दूरवर एक एकटेच इंजिन होते. ते तसे फार दूर होते आणि रूळ ओलांडून दलाजितपाशी जायला माझ्याजवळ भरपूर वेळ होता. पण मी अकारण भीतीच्या तावडीत सापडलो! माझ्या कपाळाला आणि हातांना घाम फुटला.

''चल ना!'' दलाजित घाईघाईत ओरडला.

मी दीर्घ श्वास् घेतला, फक्त समोर पाहिले आणि पळत सुटलो. मी इतका घाबरलो होतो की या सगळ्यात मी अडखळलो आणि रूळांवर पडलो. माझ्या सर्व

शरीरभर शिडशिडी भरली आणि आपल्याला उलटी होणार असे वाटले आणि खालची सगळी जमीनच जणू भूकंपाने हलू लागली. माझे स्वप्न अखेरीला खरेच ठरणार होते तर! जवळ येणाऱ्या इंजिनांची फस्स-फुस्स मला ऐकू येत होती.

"अरे रस्टी, चल, उठ आधी," दलाजितचा आवाज माझ्या कानी आला आणि तो माझ्या शेजारीच पाहून मला नवल वाटले. तो माझा दंड धरून मला उठवू पाहात होता.

त्याला पाहून मला धीर आला. मी घाईघाईने उभा राहिलो. माझी पिशवी उचलली आणि त्याच्याबरोबर दगडी बांधाकडे धावलो. लोखंडाच्या पन्हाळी पत्र्याचे कुंपण आमच्या मार्गात होते. ते जवळ जवळ दहा फूट उंच होते आणि कशाला तरी धरत कोठेतरी पाय ठेवत वर चढावे अशीही शक्यता नव्हती. त्यामुळे त्या कुंपणाच्या शेजारून आम्ही धावत होतो. अखेरीला एक फट लागली. त्यातून पलीकडे बाहेर पडलो तर समोर मालगाड्यांची जागा, गुडस् यार्ड!

एका उघड्या चक्रद्वारामधून आम्ही बाहेर पडलो आणि बाजूच्या छोट्या रस्त्यावर आलो. आम्ही गल्ली बोळातून धावत होतो. तेथे छोट्या मशिदी, देवळे, शाळा आणि दुकाने एकमेकावर रेलून एकच झुम्मड उडाली होती. आणि मग अचानकपणे आम्ही एकदम मोठ्या गर्दीच्या रस्त्यावर आलो. तेथे माणसे आणि वाहने यांचा नुसता गजबजाट होता.

आम्ही चांदणी चौकात आलो होतो! दिल्लीचा प्रसिद्ध आणि ऐतिहासिक काळापासून चांदीच्या व्यापाराचा चौक.



# चांदणी चौकातील मध्यंतर

गिऱ्हाईके, विक्रेते, कारकून, उनाड पोरे, साधू, जवाहिरे, न्हावी आणि खिसेकापू यांच्या गर्दीत आम्हाला येथे पुष्कळसे सुरक्षित वाटले. शहराचा गजबजलेला भाग हा नेह्मीच लपून बसण्यासाठी सर्वात चांगली जागा असते. कायद्याच्या बडग्यापासून पळून जाऊ पाहणारे नेह्मी एक चूक करतात. ते खेडेगावातून माणसे विरळ असणाऱ्या भागात लपू पाहतात आणि तिथे त्यांच्या वेगळेपणामुळे लवकर सापडतात. केवळ अपघाताने आम्ही दिल्लीतल्या सर्वात सुरक्षित जागेत पोहोचलो होतो.

टांगे, बैलगाड्या, सायकली, स्कूटर-रिक्षा आणि नव्या, जुन्या आणि पुरातन मोटारी सर्वच्या सर्व त्या रस्त्यावर एकमेकांच्या पुढे जाण्यासाठी धडपडत होत्या. ज्याच्याजवळ भोंगा होता तो चालक भोंगा वाजवत होता आणि ज्या कोणाजवळ घंटा होती तो ती घणघणवत होता. आणि ज्या कोणाजवळ भोंगा किंवा घंटाही नव्हती तो तोंडाने ओरडत होता.

आम्ही एक छोटेसे हलवायाचे दुकान शोधले. आणि दलजितने तपकिरी रसाळ गुलाबजाम घशात उतरवले तर मी सोनेरी वर्खाच्या जिलब्यांवर हात मारला.

एकदम आलेल्या पावसाच्या सरीमुळे आम्ही एका व्हरांड्याचा आसरा घेतला. पाऊस अगदी जोराने मुसळधार पडू लागला तसा रस्ता पटापट मोकळा होऊ लागला. आणि थोड्याच वेळात तेथला लोकांचा गलका नाहीसा झाला. दोन तीन मोटारी पाणी घुसळवत वेगाने वाहणाऱ्या पाण्यातून पुढे गेल्या आणि रस्त्यावरच्या गाई पूर्वीसारख्याच शांतपणे कचऱ्याच्या ढिगातून अन्न शोधत राहिल्या.

रस्ता आता पूर आलेल्या नदीसारखा झाला होता. आणि लहान मुलांचे एक टोळके उड्या मारत, नाचत गंमत करायला तेथे आले. पावसाच्या पाण्याने भरलेल्या गटारापाशी आल्यावर त्यांनी हसत खिदळत त्यात उड्या मारल्या. झेंडूचा एक हार वाहत वाहत रस्त्याच्या मध्यावर आला.

आणि मग अचानकपणे पाऊस एकदम थांबला. सूर्य बाहेर आला. माझ्या पायांच्या मध्ये एक कागदाची नाव तरंगत आली.

"आता आपण कुठं जायचं?" दलजितने विचारले. "स्टेशन तर काही सुरक्षित नाही."

"दुसऱ्या एखाद्या मार्गानं आपण दिल्ली सोडायला हवी पण त्याआधी रात्रीकरता म्हणून आपण एखादे स्वस्तं हॉटेल शोधायला हवे."

"अरे खरंच की. माझ्याजवळ अजून तीस रूपयांहून अधिक रक्कम आहे" दलजित म्हणाला.

"माझ्या जवळही सहा आहेत. आपल्याला तिकिटं काढायची असली तर तेवढे धरूनसुद्धा आपल्या दोघांना ते पुरेसे आहेत असं मला वाटत नाही."

"मग आपण तिकिटं काढायची नाहीत," दलजित म्हणाला.

आम्हाला हॉटेल शोधायला काही फार वेळ लागला नाही. त्याचे नाव होते 'ग्रेट ओरिएंटल हॉटेल' आणि ते होते बरोबर पोलिस चौकीच्या पिछाडीला. आपले हॉटेल तिसऱ्या दर्जाचे आहे असा सुद्धा आव त्याला नव्हता. त्यांनी पाच रुपये भाड्यानं आम्हाला पाठीमागची छोटी खोली दिली. तिला एकच खिडकी होती आणि तिच्यातून मसाले विकणाऱ्या एका अफगाणी दुकानदाराच्या गोदामाचे दर्शन होत होते. खालच्या अंगणाच्या चौकातून हिंगाचा तीव्र वास वर येत होता.

आम्ही दमलो होतो आणि आम्हाला फार गर्मी होत होती. आम्ही आमचे सामान जमिनीवर फेकले आणि आळीपाळीने तेथल्या पाण्याच्या नळाखाली बसलो. मग तेथील एकुलत्या एक पलंगावर आडवे झालो आणि संध्याकाळ होईपर्यंत झोपलो. इतके गाढ की रस्त्यावरचे आवाज, हॉटेलच्या पलंगावरच्या मऊ गादीमधल्या कीटकांनी आमच्याकडे दिलेले लक्ष, आणि कुरकुरत फिरणारा वरचा जुनाट पंखा- आम्हाला कशाचाही पत्ता लागला नाही.

आम्हाला उठायला बराच उशीर झाला आणि आम्हाला पुन्हा तुफान भूक लागली होती. दलजितने दार उघडले आणि पुकारा केला. काही वेळाने हॉटेलचा पोऱ्या खोलीत आला.

"आम्हाला चहा, टोस्ट, दोन मोठी ऑमलेटं आणि टोमॅटो सॉसची एक बाटली हवी," दलजितने त्याला सांगितले.

साधारण वीस मिनिटांनी दोन ऑमलेटे हजर झाली. ती इतकी लहान होती की बहुधा दोन्ही एकाच अंड्यापासून तयार केली होती. पाणी घालून सॉस पातळ करण्यात आले होते. आणि टोस्ट चांगलाच जळलेला होता. मीठ ओले होते आणि त्याच्यापर्यंत पोचण्यासाठी त्या भांड्याचे झाकण आम्हाला कष्टपूर्वक काढावे

लागले. मिरी मात्र भरघोसपणे बाहेर आली आणि साऱ्या अन्नाचा तीच प्रमुख भाग होती. आमची भूक भागलीच नसल्याने आम्ही पुन्हा अंडी मागितली-पण यावेळी उकडलेली अंडी. कारण ती कितीही लहान असलीतरी संबंध असणार.

"चल, बाहेर जाऊ या," दलजित म्हणाला. "इथं गुदमरल्यासारखं होतंय."

"मला अजून झोपावं वाटतंय," मी म्हटले.

"मग मी थोडा बाहेर जाऊन येतो. एखादेवेळी गुरूद्वारात जाईन."

"ठीक आहे. पण हरवू बिरवू नकोस म्हणजे झालं."

दलजित गेला आणि मी पाठीमागे पलंगावर रेललो. मी टागोरांचे 'दि गार्डनर' हे पुस्तक उघडले पण फार वेळ काही वाचू शकलो नाही. कारण संध्याकाळ पुढे सरकत गेली तशी रात्रीच्या थोड्या काळाच्या थंडाव्यात मिळणाऱ्या स्वातंत्र्यात कीटकांच्या थोर वार्षिक उड्डाणाचा मी साक्षीदार झालो. गरम हवेच्या ऋतुत निद्राधीन होणाऱ्या वाळवी आणि पांढऱ्या मुंग्या या त्यांच्या लपायच्या जागेतून बाहेर पडल्या होत्या. प्रत्येक भोक किंवा फट यातून मोठ्या पंखाच्या मुंग्या बाहेर पडल्या आणि सुरवातीला उड्डाणासाठी फडफडू लागल्या. हे त्यांच्या आयुष्यातले पहिले आणि शेवटचे उड्डाण होते. फक्त एकाच दिशेने- प्रकाशाच्या दिशेने- होणारे. मग तो घरातला किंवा रस्त्यावरचा विजेचा दिवा असो, किंवा रॉकेलचा कंदील असो. साऱ्या शहरभर हेच चालू होते. आमच्या खोलीच्या खाली असणाऱ्या रस्त्यावरच्या दिव्याने तर वाळवीच्या गोंधळलेल्या मोठ्या थव्याला इतके आकर्षून घेतले होते की जणू ते सगळे मिळून हळू हळू गोलाकार फिरणारे एकच शरीर झाले होते.

पालींची आता चंगळ होती. इतके आठवडे शांतपणे वाट पाहण्याचे त्यांचे फळ त्यांना मिळाले होते. आपल्या चिकट, तांबडट जिभांनी त्या भराभरा कीटकांना एका पाठोपाठ एक मटकावत होत्या. कितीतरी तास त्यांची ही मनोसक्त पोटपूजा चालू होती. ऋतू बदलेपर्यंत आपल्याला ही अशी मेजवानी पुन्हा मिळणार नाही हे त्यांना माहिती होते ना! अंधारातून प्रकाशांकडे नेणाऱ्या या उड्डाणासाठी संबंध उन्हाळाभर कीटक जग तयारी करत असते पण स्वातंत्र्य उपभोगण्यासाठी एकही जिवंत राहात नाही.

मला पेंग येऊ लागली आणि मी डोळे मिटून घेतले. तथापि खिडकीतून शहरातील रस्त्यावरच्या अव्याहत वाहतुकीचे आवाज येत होते. गलबते आणि दूरदूरची बंदरे फार फार दूर वाटत होती. परंतु त्याचप्रमाणे टेकड्या आणि डोंगरावरून वाहणारे ओढेसुद्धा.

केव्हातरी मला झोप लागली आणि मी उठलो ते दलजित परत आल्यावरच.

"मी आपल्यापुढचा प्रश्न सोडवला आहे." तो आनंदाने हसत म्हणाला. "आपण आगगाडीच्या भानगडीतच पडायला नको. मी एका ट्रकवाल्याशी दोस्ती केलीय. आणि तो आपल्याला जयपूरपर्यंत घेऊन जायला तयार आहे. म्हणजे जवळ जवळ तीनशे मैल. तेथून आपण आगगाडीनं गेलो तर आपल्याला कोणाचंच भय वाटायचं कारण नाही."

"तुझा मित्र आपल्याला केव्हा नेणार?"

"त्याचा ट्रक उद्या पहाटे चारला निघणार आहे."

"दुष्ट लोकांना विश्रांतीच नसते हे खरं आहे," मी म्हटले. "पण एक खरं. जितक्या लवकर आपल्याला येथून जाता येईल तितक्या लवकर आपण जायला हवं. आज बुधवार आहे. आणि माझ्या काकांचं गलबत बहुधा शनिवारी बंदर सोडेल. तो ट्रकवाला किती पैसे घेणार?"

"शून्य. तो आपल्याला फुकट नेणार. तो ट्रक चालक शीख आहे आणि मी त्याला पटवलंय की त्याचं आणि माझं लांबचं नातं पण आहे. त्याच्या वहिनीच्या पुतणीशी माझ्या मेव्हण्याचं लग्न लागलेलं आहे."



# ममताबरोबरची वाटचाल

दुसऱ्या दिवशी पहाटे चारला आम्ही लाल किल्ल्याजवळ गेलो. त्याचे तट चांदण्याच्या प्रकाशात काळपट दिसत होते. आदल्या संध्याकाळी इतक्या भरपेट गर्दीने ओसंडून वाहणारे रस्ते आता मोकळे मोकळे होते. फरसबंदीवर रस्त्यांवरच्या दिव्यामुळे प्रकाशाची एकाकी थारोळी तयार झाली होती. एखादी मोटार आवाज न करता निघून जायची पण तिचं जग वेगळंच असल्यासारखी.

किल्ल्याच्या जवळ अजूनही उघडे असलेले काही धाबे आम्हाला दिसले. दिवसा झोप आणि रात्री प्रवास करणारे ट्रकवाले हे त्यांचे गिऱ्हाईक होते.

आमचा ट्रकवाला एक उंच आणि दाढीवाला शीख होता. तो अचानक अंधारातून दत्त म्हणून आमच्यासमोर उभा राहिला. त्याच्याबरोबर एक साथीदारही होता. तोही शीख आणि आतल्या कपड्यांतच होता.

"तुम्ही गाडीत पाठीमागं चढा," पक्क्या पंजाबीत चालक म्हणाला. मला ती पुरेशी कळत होती. "आपण काही मिनिटांत निघू."

त्याचा ट्रक त्याने पिंपळाच्या झाडाखाली थांबवला होता. आमचे शरीर वर उचलत, स्वतःला ओढत आम्ही उघड्या ट्रकच्या पाठीमागच्या बाजूला कसेबसे चढलो आणि अचानकपणे आम्हाला कोणाची तरी धडक बसली. प्रथम तर आम्हाला तो प्राणी म्हणजे इतिहासपूर्व कालात पृथ्वीवर वावरणाऱ्या बलाढ्य राक्षसी प्राण्यासारखाच, डायनोसोरसारखाच वाटला.

त्या राक्षसी प्राण्याने नाकाने एकदा डुरकी दिली आणि ट्रकच्या बाजूंना जोराने लाथा मारल्या. आम्ही तर एकदम कोलमडलोच.

"भय्याजी!" दलजित ट्रकवाल्याला ओरडून म्हणाला. "इथं कुठला तरी प्राणी आहे!"

"काळजी करू नका. ती आपली ममता आहे," ट्रकवाला म्हणाला.

"पण ती इथं काय करतेय?"

''ती आपल्याबरोबर येणार आहे. मी तिला जयपूरच्या बाजारात नेतोय. तेव्हा तिच्या बरोबर रहा पोरांनो, आणि अगदी आरामात प्रवास करा.''

आपल्या सहप्रवाशाकडे जवळून नीट पाहण्याइतका प्रकाश एव्हाना पडला होता. ती एक चांगलीच दांडगट पंजाबी म्हैस होती.

''अगदी उत्तम म्हैस आहे.'' दलजित म्हणाला. त्याला बहुधा अशा जनावरांची पारख होती. ''तिचे निळे डोळे पाहिलेस ना?''

''म्हशींचे डोळे निळे असतात हे मी आजच ऐकतोय,'' मी म्हटले.

''फक्त उत्तम म्हशींचेच डोळे तसे असतात,'' दलजित म्हणाला. ''पिंगट डोळ्यांच्या म्हशींपेक्षा निळ्या डोळ्यांच्या म्हशी अधिक दूध देतात.''

सुदैवाने सरदारजीने आता ट्रक सुरू केली आणि नदीवरून येणाऱ्या पहाटेच्या वाऱ्याबरोबर म्हशीचा वास थोडासा का होईना पण वाहत बाहेर गेला.

लवकरच आम्ही दिल्ली मागे टाकली आणि वेगाने जयपूरकडे जाऊ लागलो. नुकत्याच झालेल्या पावसामुळे खोलगट पाणथळीत पाणीच पाणी झाले होते आणि करकोचे, बगळे, आणि पाणपक्ष्यांची गर्दी होती. शेते आणि झाडे जणू रंगीबेरंगी सुंदर पक्षांनी शाकारली होती: लांब शेपटीचा कावळा,निळकंठ, सुगरण, बाया आणि अधून मधून मोठ्या पांढऱ्या डोक्याचा पक्षी-तो म्हणे विष्णूचे सुप्रसिद्ध वाहन, गरुड होता.

राजस्थानात् आम्ही अधिकाधिक आत जाऊ लागलो तसे मोर अधिकाधिक आणि उंटही दिसू लागले. ते त्यांच्या काटकुट्या चालीत रस्त्याच्या कडेने एका ओळीत शिस्तीत जात असायचे. आणि झाडेझुडपे विरळ होत वाळवंट आले तेव्हा माणसेच रंगीबेरंगी दिसू लागली. आसमंतातल्या रंगाची कमतरता जणू त्यांना स्वत:च भरून काढायची होती!

बायकांनी रूंद घोळाचे तांबडे घागरे घातले होते आणि सोन्या चांदीचे दागिने परिधान केले होते. त्या दिसायला छान, उंच, गोऱ्या आणि सशक्त होत्या. पुरूषसुद्धा उंच होते आणि त्यांच्यातील म्हाताऱ्यांच्या वाढलेल्या पांढऱ्या दाढ्या वाऱ्याबरोबर हलत होत्या.

दिवस वाढला तसा सूर्यही आकाशात अधिकाधिक वर जाऊ लागला आणि त्याबरोबर रस्त्यावरची रहदारीही वाढू लागली. पण आमच्या ट्रकवाल्याने गाडीचा वेग कमी करण्याऐवजी अधिकच वाढवला. जणू त्याला म्हशीला पोचती करायची घाई होती. लवकरच त्याने समोरच्या ट्रकच्या पुढे जायचे प्रयत्न सुरू केले.

समोरचा ट्रकही भरवेगात होता आणि त्याच्या चालकाला रस्त्याचा मध्यभाग सोडायचा नव्हता. त्याच्या गाडीत ऊस खच्चून भरलेला होता.

''ही आता शर्यतच होणार आहे,'' नीट दिसावे म्हणून अगदी म्हशीला चिकटून उभे राहिलेल्या दलजितने म्हटले.

दोन मोठ्या वाहनांना एकाच वेळी जाता येईल इतका तो रस्ता रूंद नव्हता. आणि पुढचा ट्रक रस्ता द्यायला तयार नसल्याने आमच्या गाडीला धुळीने भरलेल्या बैलगाडीच्या रस्त्यावर जावे लागले. त्याबरोबर धुळीचे लोटच्या लोट ट्रकच्या पाठीमागच्या बाजूला उडू लागले आणि आम्ही गुदमरू लागलो. खड्ड्यांच्या रस्त्यावर, बैलगाड्यांच्या पडलेल्या चाकोऱ्यांवरून जावे लागत असल्याने ट्रक मोठमोठे गचके देऊ लागली आणि आम्ही तळाशी फेकले गेलो. ममता इतकी बिथरली की तिने आम्हाला जवळ जवळ तुडवलेच. मग एक फार मोठा गचका बसला. कचकन गाडी थांबवल्याचा आवाज झाला आणि आम्ही थांबलो.

धूळ विखरून कमी झाली तेव्हा आमच्याकडे काळजीने पाहणाऱ्या आमच्या चालकाचा दाढीवाला चेहरा आम्हाला दिसला.

''तुम्ही ठीक आहात ना?'' त्याने खरखरीत आवाजात विचारले.

''होय, आम्ही ठीक आहोत,'' मी म्हटले.

''तुम्ही त्या दुसऱ्या ट्रकला मागे टाकलेत?'' दलजितने विचारले.

''नाही,'' चालक फुत्कारला. ''तो आपल्याला वाट देत नाही. तिचा चालकही शीख आहे. मला वाटतं तुम्ही आता पुढं यावं.''

आम्ही लागलीच होकार दिला आणि त्याचा सहकारी नाइलाजाने, थोडेसे मनाविरूद्धच, म्हशीच्या शेजारी बसला.

काही मैल गेल्यावर चालक मैत्रीशील झाला आणि आपले नाव गुरनाम सिंग आहे हे त्याने आम्हाला सांगितले.

''तुम्हाला माझा नवा भोंगा ऐकायचाय का?'' त्याने पंजाबीत विचारले.

''आम्ही तोच तर आतापर्यंत सारखा ऐकत होतो, नाही का?'' मी हिंदीत म्हटले. आमचे आता चांगले मेतकूट जमले होते.

''तो पाठीमागे एवढा चांगला ऐकू येत नाही,'' तो म्हणाला.

''म्हणून तर मी तुम्हाला या इथं पुढं आणलं. आता तो तुम्हाला कसा वाटतो ते सांगा,'' तो म्हणाला आणि त्याने कर्णकर्कश आवाजाने पुढचा भाग हादरून टाकला.

कानात बोटे घालत मी म्हटले, ''हा अगदी छान भोंगा आहे. यापेक्षा अधिक जोरानं काहीच वाजत नसेल.''

''हा इथून अर्ध्या मैलावरही ऐकू येतो,'' गुरनाम सिंग अभिमानाने म्हणाला

आणि एका सायकलवरून दोन तरूण चालले होते त्यांच्याकरता त्याने तो वाजवला. ते हादरूनच गेले आणि घाईघाईने रस्त्यावरून बाजूला झाले.

''हा आपल्या इथंही खूप जोरात आवाज करतो, नाही?'' मी म्हटले आणि मग त्याला राग तर येणार नाही ना या भीतीने म्हटले, ''म्हणजे अर्थातच त्यानं काही बिघडतं असं नाही.''

''तुमचा भोंगा फक्त एकाच पट्टीत वाजतो का?'' दलजितने विचारले.

मला वाटले की हा जरा आगाऊपणा झालाय पण गुरनाम सिंगला तो प्रश्न आवडल्यासारखे दिसले.

''दोन!'' तो जोरात म्हणाला. ''एक पुरुष आणि एक स्त्री. आता बघा.'' आणि त्याने एकदा वरच्या पट्टीत आणि नंतर खालच्या पट्टीत भोंगा वाजवून दाखवला. दोन्ही वेळेला कान तर फुटणार नाहीत ना, अशी भीती वाटली. आमच्या पुढे असणारा एक उंट रस्त्यावरून पळाला आणि शेतात घुसला!

''हा भोंगा एकदम मस्त आहे.'' गुरनाम सिंग म्हणाला. ''या ट्रककरता मी तो मुद्दाम बनवून घेतला. मला परदेशी भोंगे आवडत नाहीत. ते पुरेसे जोरात वाजत नाहीत. भारतीय भोंगेच सर्वोत्तम असतात.''

तुलनात्मक मानाने थोडीशी शांतता झाल्यावर मी आवाजांच्या गुणांचा विचार करू लागलो. काही आवाजांचा कर्कशपणा, तर काही आवाजातली माधुरी किंवा मोटारींचा एकच भोंगा काहींना का आवडतो तर तोच दुसऱ्यांना भयंकर का वाटतो? इत्यादी.

''हा जुन्या दिल्लीत तयार करून घेतला आहे.'' माझ्या विचारमालिकेला खीळ घालत गुरनाम सिंग आपल्या भोंग्याबद्दल अधिक माहिती पुरवू लागला. ''फक्त पंच्याहत्तर रुपये. मला हवा तस्सा हातघडणीचा. त्याच्यात एक दोष आहे. तो भिजता कामा नये.''

त्याची मूठ पुन्हा एकदा भोंग्यावर आदळली तशी पाऊस येण्याकरता प्रार्थना करावी असे मला वाटले. पण आकाश अगदी स्वच्छ होते तेव्हा मी विचार केला की अशी प्रार्थना अशक्य गोष्टीची मागणी करण्यासारखी ठरेल.

''पण अरे, असा भोंगा हाताखाली असणं म्हणजे काय चीज आहे हे तुला समजलेलं नाही. तू एकदा वाजवून तर बघ मित्रा. तू स्वतःच का नाही वाजवून बघत?''

प्रश्न मला विचारण्यात आला होता. कारण मीच त्याच्या शेजारी होतो आणि दलजित दाराच्या जवळ होता.

''अहो, ते सगळं ठीक आहे,'' मी म्हटले. ''त्याचा दर्जा किती अप्रतिम

आहे हे तुम्ही सिद्ध करून दाखवलेलंच आहे."

"नाही, तू तो वाजवायलाच हवास. माझा तसा हट्ट आहे," तो एकदम मोठ्या मुलासारखा म्हणाला. जणू तो माझा मोठा भाऊ होता आणि आपले नवे खेळणे आणि त्याची गंमत आपल्या धाकट्या भावाला दाखवायचीच असा त्याचा इरादा होता.

त्याने माझा हात पकडला आणि भोंग्यावर ठेवला आणि मी तो भोंगा वाजवतोय हे जाणवल्यावर सुखाची शिरशिरी माझ्या सगळ्या हाताच्या नसानसातून रसरशीतपणे फिरली. मी जोरात दाबले. आणि आवाजाचा संगीतमय प्रवाह खळखळाट करत ट्रकमध्ये आणि बाहेर पडला. मी भोंगा दाबूनच ठेवला. मला चालकाच्या सुखाचा प्रत्यय आला होता. असा भोंगा हाताखाली असेल तर रस्त्यावरच्या या राजांची ताकत आणि रूबाब म्हणजे काय असते ते मला प्रत्यक्षात अनुभवता येत होते.



# जयपूरच्या वेशीवरचे दरोडेखोर

आम्ही जयपूर गाठले तेव्हा अंधार पडू लागला होता. आम्हाला शहर असे काही फारसे पाहायला मिळाले नाही. आम्ही रात्र गुरनाम सिंगच्या बरोबर ट्रकच्या पाठीमागच्या भागात झोपून काढली. जयपूरच्या रात्री थंड असतात. उन्हाळ्यातसुद्धा. गुरनाम सिंगने आपल्या पांघरूणात आम्हालाही जागा दिली. ट्रकमधे असे झोपायची त्याला सवय होती. साहजिकच तो लवकर झोपी गेला आणि मोठ्याने व तालबद्धपणे घोरूही लागला. माझी आणि दलजितची मात्र सारखी चुळबुळ चालू होती. त्या रात्रीत त्याने मला कितीतरी वेळा लाथा मारल्या. ट्रकचा पाठीमागचा तळ फार कठीण होता आणि त्याला कितीतरी म्हशींचा वास येत होता.

आम्हाला झोप लागते न लागते (म्हणजे आम्हाला तरी तसे वाटले) तोच गुरनाम सिंगने आम्हाला उठवले. "चार वाजत आलेत," तो म्हणाला, "आणि मला यावेळी तांबडे दगड घेऊन परत जायचे आहे."

"काय हे आयुष्य आहे!" एका हाताने झोपेतच आपले डोळे चोळत दलजित म्हणाला. "काही झालं तरी मी ट्रक चालक होणार नाही."

"माणसाला कसं ना कसं तरी जगावंच लागतं," गुरनाम सिंगने तत्त्वज्ञान सांगितले. "मला गाडी चालवायला आवडते. मला सहाव्या का सातव्या वर्षापासून गाडी चालवता येते. आणि तसे पैसेही भरपूर मिळतात. आता मी दिल्लीला गेलो, की दोन दिवस सुटी. ती सुटी मी माझ्या बायकोमुलाबरोबर काढणार. अच्छा आता, मुलांनो. आणि तुम्ही पुन्हा दिल्लीला आलात तर मी तुम्हाला लालकिल्ल्याच्या भिंतीखाली सापडेन."

त्याची ट्रक भरदिशी सुटली तशी आम्ही हात हलवून त्याचा निरोप घेतला. ट्रकने भरपूर मोठा आवाज केला होता आणि त्यामुळे बहुधा आजुबाजूला राहणारे जागे झाले असणार. कुत्री भुंकू लागली आणि कोंबडाही आरवू लागला.

आम्ही शहराच्या सीमेवर होतो. समोर एक भले मोठे तळे होते. दुसऱ्या बाजूला मोकळा भाग होता. वृक्षरहित टेकड्या आणि वाळवंट. तथापि तेथेच बाभूळ आणि काटेरी झुडपे यांच्यात गुरफटलेले एका राजवाड्याचे किंवा शिकारीकरता बांधलेल्या इमारतीचे अवशेष आहेत असे आम्हाला दिसत होते.

"आपण तिकडं जायचं का?" दलजित म्हणाला. "तळ्यात आंघोळ करून आपल्याला विश्रांती घेता येईल. नंतर सकाळी शहरात जाऊन आपल्याला आगगाडीची माहिती काढता येईल."

आम्ही तळ्याच्या काठाकाठाने जाऊ लागलो. विरुद्ध बाजूला जायला आम्हाला चांगला अर्धातरी तास लागला.

शेतांतून कोणीच नव्हते. फक्त एक उंट विहिरीच्या भोवती गोल गोल असा फिरत होता आणि छोट्या छोट्या पसरट बादल्यांतून पाणी वर काढत होता. एका खेडेगावातून धूर उंचावत होता आणि सकाळच्या शांत वातावरणात पाण्याचा आवाजसुद्धा आमच्या कानांवर आला.

त्या अवशेषाच्या खिंडारापर्यंत पोचायला आम्हाला वीस एक मिनिटे लागली. बहुधा शिकार भरपूर होती त्या वेळी एखाद्या रजपूत राजाने शिकारीच्या वेळी वापरात आणायसाठी बांधलेली ती इमारत होती. तिचे प्रवेशद्वार दगड आणि माती यांनी पुरते बंद झालेले होते. पण बाजूची एक भिंत पडलेली होती. आम्ही त्या फटीतून वर चढलो आणि दगडी फरसबंदीच्या अंगणात आलो. मध्यभागी एक कोरडे, सुरू नसलेले दगडाचे कारंजे होते. त्या दगडी कारंज्याच्या तळाशी पडलेल्या एका भेगेमध्ये एक छोटेसे पिंपळाचे झाड वाढत होते.

ते अंगण ओलांडून आम्ही मुख्य वास्तूपाशी आलो. दलजित एकदम थांबला आणि म्हणाला, "तुला कशाचा तरी वास येतोय?"

"होय," मी म्हटले. "रस्सा"

हे असे काही सापडेल याची आम्हाला कल्पनाही करता आली नव्हती. त्या अवशेषांत कोणीतरी राहात होते! आता येथून वळावे आणि परतावे असा विचार माझ्या डोक्यात तरळला. पण औत्सुक्याने सगळ्यावर मात केली- औत्सुक्य आणि रश्श्याचा घमघमाट! मी आणि दलजित पुढे झालो. उन्हातून कौलारू व्हरांड्याच्या छायेत. तेथला दरवाजा आतल्या अंधाऱ्या खोलीत उघडत होता आणि तेथूनच रश्श्याचे वास येत होते. आम्ही तेथे उभे राहिलो अज्ञाताच्या काठावर- काय करावे आणि काय नाही याचा विचार करत.

"चल पुढं," दलजित म्हणाला.

"मी तुझीच वाट पाहात होतो," मी म्हटले.

मी आणि दलजित एकाच वेळी त्या खोलीत शिरलो. खोली मोकळी होती.

एका कोपऱ्यात चूल होती आणि तिच्यावरच्या भांड्यामध्ये काहीतरी चवदार शिजत होते. पण स्वैपाक्याचा पत्ताही नव्हता.

मी काळजीपूर्वक विस्तवाजवळ गेलो, भांड्यावरचे झाकण उघडले आणि वास घेतला. कोंबडीचा रस्सा! आजुबाजूला काहीही नसलेल्याच्या मध्यभागी एका पुरातन, ढासळलेल्या शिकारखान्यात कोंबडीचा रस्सा! तो तेथे का आणि कसा आला याचा विचार करण्याच्या भानगडीत आम्ही पडलो नाही. आजुबाजूला दुसरी काही भांडीही दिसत नव्हती. तेव्हा आम्ही आमची बोटे रश्श्यात घातली आणि मला मिळालेल्या मांसाच्या तुकड्यात मी दात रोवतो न रोवतो तोच पाठीमागून दोन भक्कम हातांनी मला आवळले आणि जमिनीवरून उचलले.

मी इतका दचकलो की माझ्या तोंडातला कोंबडीचा तुकडा आपोआप खाली पडला. त्या कोणाच्या पकडीतून सुटण्यासाठी मी धडपडलो पण त्याचे दंड फारच ताकतवान होते. ते माणसाचे हात आहेत, कोणा भुताचे नाहीत हे पुढच्या हातावर असलेल्या काळ्या केसांमुळे मला कळले. मी धडपड केली, लाथाही मारून पाहिल्या, आणि मग कोणीतरी दुसरा माणूस माझ्यासमोर अवतरला आणि त्याने माझे पाय पकडले. दलजितही अजून एका माणसाशी धडपडत आहे हे मला आवाजावरून कळले आणि त्याला जोराने हाक मारण्याचा मी प्रयत्न केला पण अद्‌भुतपणे उगवलेल्या तिसऱ्या माणसाने माझ्या तोंडात मेणचट बोळा घातला. त्याने माझे हात पकडले आणि दोरीने माझे पाय बांधेपर्यंत धरून ठेवले. माझ्या हातापायांना माझ्या शरीराशी बांधून झाल्यावर मला जमिनीवर पालथे टाकण्यात झाले. मी पाहिले तर दलजितचीही दुसऱ्या कोपऱ्यात माझ्यासारखीच स्थिती झाली होती. आम्हाला काही करता येणेच अशक्य होऊन बसले होते आणि खोलीत कमीत कमी पाच तरी माणसे होती.

"हा तर लहान मुलगा आहे," खाली वाकून आणि माझा चेहरा न्याहाळत एक माणूस तेथल्या प्रादेशिक हिंदी बोलीत म्हणाला. (आश्चर्य तर खरेच, पण मला ती बोली समजत होती.) अंधारामुळे मला त्याचा चेहरा नीट न्याहाळता आला नाही. पण माझ्या मानेला स्पर्श होत असल्याने त्याला दाढी आहे हे मला समजले आणि त्याच्या तोंडाला लसणीचा उग्र दर्प येत होता.

"मुलगा काय, माणूस काय किंवा मुलगी काय," दुसरा एकजण म्हणाला. "जे कोणी आपले जेवण पळवून नेण्याचा प्रयत्न करतं त्याला झोडपूनच काढायला हवं."

"हा तसा चांगला गोरा आहे," दाढीवाला म्हणाला.

"हा परदेशी आहे का?"

"नाही. अर्धा अर्धा आहे. चला, यांना अंगणात नेऊ या. म्हणजे बाहेर आपल्याला त्यांना नीट पाहता येईल."

"नाही, आपण स्वतःला असं उघड करता कामा नये. कोणीही खेडुतानं आपल्याला या जागेत पाहिलं तर ती बातमी सगळीकडं पसरेल. आपल्याला ही जागा पुन्हा वापरायची आहे."

"मग दिवा तरी लावा."

एकाने रॉकेलचा कंदील पेटवायचा प्रयत्न करायला सुरवात केली. तो माणूस त्या खोलीत सर्वात उंच होता. कंदीलाची ज्योत पेटली आणि भिंतीवर त्याची भलीमोठी सावली पडली. हा माणूस म्हणजे राक्षसासारखाच होता. सहा फुटाहूनही अधिक कितीतरी इंच उंच. त्याची छाती उघडी होती. आणि डोक्यावरचे केस बारीक कापलेले. लोखंडांचे गोळे असावेत तसे त्याचे स्नायू होते. दाढीवाल्या माणसाच्या मागचा माणूस आज्ञा देत आहे असे वाटत होते. परंतु तो मला अजून काही दिसला नव्हता.

"त्याला उलटा कर म्हणजे आपल्याला त्याला नीट पाहता येईल," तो म्हणाला.

त्या राक्षसाने मला ढकलून जमिनीवरच उलटें केले. त्यामुळे वरच्या काळ्या तक्तपोशीकडे हताशपणे पाहात राहणे याशिवाय गत्यंतरच नव्हते. काही क्षणातच तीन चेहरे माझ्या चेहऱ्याकडे निरखून पाहू लागले. सर्वस्वी त्यांच्या दयेवर अवलंबून, काळीकुट्ट खोली, हातपाय बांधलेले, तोंडात बोळा आणि हातपाय शरीराला जखडून उताणा केलेला- मी भीतीने थरकापत होतो. ते सगळे गुन्हेगारांसारखे वाटत होते. बहुधा दरोडेखोर असावेत आणि हा जीर्ण, पडलेला वाडा त्यांची लपून राहायची जागा असावी.

दाढीवाल्याच्या गालाच्या हाडांची ठेवण वरच्या बाजूला होती आणि त्याचे डोळे तिरकस होते. त्या राक्षसाचे नाक मोठे आणि ओठ घट्ट आणि जाड होते. तथापि चेहऱ्यावरून तो क्रूर वाटत नव्हता. मला भीतीने ग्रासले होते ते त्या तिसऱ्या माणसाने. खरे म्हणजे तो मोठा नव्हता की भयप्रद नव्हता. आणि तसेच म्हणायचे तर तो माझ्याकडे खाली स्मित करत पाहात होता. पण त्या स्मितामुळे माझा सारा कणान्कण थरथरत होता.

"आमची कोंबडी खाऊ पहात होतास ही काही फारशी चांगली गोष्ट नाही," तो गोड आवाजात म्हणाला."विशेष करून या भंबिरीनं ती पळवून आणायचे श्रम घेतल्यानंतर तरी!"

"होय, अगदी मध्यरात्री," तो राक्षस भंबिरी उद्गारला. भंबिरी म्हणजे फिरणारा भोवरा. त्या राक्षसाचे नाव असे विचित्र होते. "तीन कुत्री आणि अर्धा गाव शेतातून पळत माझा पाठलाग करत होते. पण मी बरोबर चकवलं त्यांना." आणि स्वत:वरच खूष होत त्याने मोठ्याने 'चक्-चक्' केले.

"झाला एवढा विनोद बस झाला" दाढीवाला उदासपणे म्हणाला. "कोंबडी इतकी महत्वाची नाही. हे इथं खरे आले कशासाठी? त्यांना काय काय कळलंय आहे असं तुम्हाला वाटतं?"

"यालाच विचारूया," तो बुटका भीतीदायक माणूस म्हणाला. तो खाली वाकला, काही वेळ तिखटपणे माझ्या डोळ्यात पाहात राहिला आणि मग माझ्या तोंडातला बोळा त्याने काढला. बोळा निघतो न निघतो तोच काहीतरी गार आणि भक्कम माझ्या खालच्या दातांपाशी मला जाणवले. एखाद्या दंतवैद्याने आपल्या रूग्णाची सुरवातीची तपासणी करावी तसे ते होते व तो बुटका, भयंकर माणूस ती सुऱ्याच्या टोकाने करत होता.

"आम्ही सांगू तेव्हाच फक्त बोलायचं किंवा ओरडायचं," तो म्हणाला. मग चाकू बाजूला करत तो पाठीमागे झाला.

"त्याला जरा बसू दे. आत्ता बोल. तुला मी काय म्हणतोय ते समजतंय ना?"

मी मानेने होकार दिला. भंबिरी पुढे झाला आणि सहजगत्या मला उचलून भिंतीला चिकटून बसवले.

"माझी मनगटं दुखू लागलीत," मी म्हटले.

माझे हात मोकळे करण्यासाठी भंबिरी आला. पण त्याचा म्होरक्या म्हणाला, "मूर्खा, त्याचे हात सोडू नकोस." आणि राक्षस दूर सरकला.

"आता सांग, तुम्ही इथं काय करताय?"

"आम्ही फक्त विश्रांती घेण्यासाठी जागा शोधत होतो," मी म्हणालो.

"भंबिरी, त्याचा हात जरा पिरगाळ पाहू."

माझा हात खरोखरच पिरगाळायची त्या राक्षसाची इच्छा नव्हती असे मला वाटते, पण त्याने जो छोटासा झटका दिला त्याने सुद्धा मला एकदम ओरडावे लागले. नक्कीच तो पूर्वी केव्हातरी पहिलवान असला पाहिजे.

"खोटं बोलू नको." तो नेता म्हणाला. "खोटं बोलणं फार दुखापत करून घेणारं असतं. तुम्ही आमच्यावर पाळत ठेवत होतात."

"आम्हाला तुमच्याबद्दल काहीच माहिती नाही, मी कळवळून म्हणालो. आम्ही जयपूरमध्ये फक्त एक रात्रच आहोत."

"ते गुप्तहेरांसारखे वाटत नाहीत," दाढीवाला म्हणाला. "ही फक्त मुलं आहेत."

"आम्ही जामनगरला निघालो आहोत." म्हणालो. "आमच्या जवळ पैसेही फार नाहीत."

"म्हणून तुम्ही आमचे अन्न पळवून नेणार होता!" भंबिरी कडकपणे म्हणाला. आम्ही पोलिसांचे गुप्तहेर असू यापेक्षाही त्याचे जेवण जाणार होते हे त्याच्या मनाला अधिक लागले होते.

"त्यांच्या जवळ पैसे किती आहेत हे एकदा पाहू या," तो बुटका म्हणाला. त्याने माझ्या साऱ्या खिशातून पाहिले आणि काही नोटा आणि चिल्लर जमा करून ठेवली. मग तो दलजितकडे गेला. त्याच्या तोंडात अजूनही बोळा होता आणि तो अगदी असहाय्य स्थितीत होता. त्या माणसाने दलजितचे पैशाचे पाकीट घेतले आणि उघडून पाहिले. "यात तीस चाळीस आहेत," तो म्हणाला. त्याने सगळेच्या सगळे स्वत:च्या खिशात ठेवले.

"आता यांना मोकळे करायचे का?" भंबिरीने विचारले.

"नाही, मूर्खा. ते आरडाओरडा करतील. जे काही अन्न राहिले आहे ते संपवा आणि मग आपण निघून जाऊ या."

तेव्हा आम्ही आपले तेथे जवळ जवळ पंधरा मिनिटे तसेच बांधलेल्या अवघड अवस्थेत पडून राहिलो. तेवढ्या वेळात दरोडेखोरांनी आपले जेवण संपवले. त्यांना काहीही पाठीमागे शिल्लक ठेवायचे नव्हते. आणि सारे अन्न संपले तशी त्यांनी आपली बोटे चाखली आणि आरामात ढेकर दिले. भंबिरीचा ढेकर गमतीदार होता. तो पोटातून अगदी खालपासून यायचा, हळू हळू वर चढताना त्याचा आवाज वाढत जायचा आणि मग सारी खोली भरून टाकायचा. जणू कोणी टोला मारून घणघणवलेली घंटाच. तो बुटका त्याच्या कुजकट स्वभावासारखीच हळूच ढेकर द्यायचा.

"आपण यांना इथंच सोडू या," माझ्याकडे पाहात छद्मी स्मित करत तो म्हणाला. "त्यांना हवी तेवढी विश्रांती घेऊ देत. ते दोन एक दिवस तरी बहुधा कोणाला सापडणार नाहीत. भंबिरी, या गोऱ्या पोराचे तोंड पुन्हा बंद कर."

राक्षस माझ्यावर वाकला. आणि त्यामुळे कंदीलाचा सारा प्रकाश झाकला गेला. तथापि अंधारातसुद्धा मला वाटले की त्याच्या डोळ्यात माझ्याविषयी सहानुभूतीची छटा आहे. त्याने माझ्या तोंडात तो घाणेरडा बोळा कोंबला आणि कापडाच्या पट्टीने तो पक्का केला. आणि मग, मला प्रकाशापासून अजूनही दूर ठेवत, त्याने आपला हात माझ्या पाठीशी घुसवला आणि चटदिशी मला बांधून ठेवलेल्या दोराची तिथली गाठ सैल केली.

"ठीक आहे. आता जाऊ या," नेता म्हणाला. तो तिथून बाहेर पडला आणि त्याच्या पाठोपाठ इतरही गेले. भंबिरी सगळ्यात शेवटी गेला पण त्याने आम्हा दोघांकडे एकदाही वळून पाहिले नाही. त्यांच्या पावलांचा आवाज ऐकू येईनासा होईपर्यंत मी दम काढला आणि मग भंबिरीने सैल केलेल्या दोराच्या गाठीतून आपले हात सोडवले आणि पहिल्यांदा तोंडातून तो घाणेरडा बोळा उचकटून टाकला. माझे पायही सोडवून घेतल्यावर मी रांगत रांगत दलजितकडे गेलो. मी त्याच्या तोंडातला बोळा काढला आणि मग त्याची मनगटे बांधलेल्या दोराकडे लक्ष केंद्रित केले.

"तू तुझी सुटका कशी केलीस?" आपला आवाज परत मिळाल्यावर त्याने पहिला प्रश्न केला.

"मोठ्यानं बोलू नकोस," मी म्हणालो. "ते एखादेवेळी परत येतील. त्यांची अन्न शिजवायची भांडी अजून इथंच आहेत. पण बहुधा ती दुसऱ्या कोणाची तरी असतील."

"पण रस्टी, तू सुटका कशी करून घेतलीस?"

"इतरांचं लक्ष नसताना त्या मोठ्या माणसानं माझे हात सोडवले. मला वाटतं त्याला आपली दया आली."

"त्याच्या दयाळू हृदयाबद्दल देवाचे आभार मानायला हवेत," भारून गेलेल्या आवाजात दलजित म्हणाला. "आपण इथं कित्येक दिवस असेच पडून राहिलो असतो. भुकेनं किंवा तहानेनं व्याकुळ होत. अगदी मरेपर्यंत. भूक किंवा तहान यातल्या कोणत्याही पहिल्या गोष्टीमुळं."

सुटका झाल्या झाल्या तो उठून बसला आणि हातपाय पुढे मागे करू लागला. मग त्याने आपले गुडघे हनुवटीपाशी आणले आणि माझ्याकडे काळजीने पाहिले.

"रस्टी, आता आपण काय करायचं? त्यांनी आपले पैसे घेतले. आता आपल्याला कुठंच जाता येणार नाही. पुढं किंवा मागं. आता आपल्याला जवळच्या पोलिस चौकीत जाऊन आपली हकीकत सांगण्यापलीकडं गत्यंतर नाही."

"त्यांनी आपल्या हॅवरसॅक्ससुद्धा नेल्या आहेत. ते जर दरोडेखोर असले तर जे काही नेता येईल ते घेऊन जाणं हा त्यांचा धर्मच आहे. आपण नशीबवान आहोत म्हणायचं. ते आपला खूनही करू शकले असते."

"त्यांनी बळी घेतलेले आपण पहिलेच नसणार. तो बुटका माणूस..." कपाळाला आठ्या घालून दलजित शक्याशक्यतांबद्दल विचार करत होता. मग, त्याचे हात खिशांमध्ये असताना, त्याचा चेहरा एकदम उजळला. "रस्टी, ते तितके काही हुशार नव्हते. ते माझं घड्याळ घ्यायला विसरले यावरूनच कल्पना कर आणि माझ्या एका खिशात थोडीशी मोडही आहे."

''वा! हेही काही कमी नाही,'' मी म्हणालो.''आपण उपाशी राहणार नाही. आपल्याला केव्हाही घड्याळ विकता येईल. पण ते न विकता आपल्याला जामनगरला कशानं तरी पोचता आलं तर... आपल्याला घड्याळ खऱ्या गरजेकरता शिल्लक ठेवता येईल.''

''ही खरी गरज नाही?''

''तशी आहे रे. पण....''

''आणि आपण अजूनही पुढं जावं असं तुला वाटतं? तू अजूनही माघार घेतली नाहीस?''

''तुझ्याबद्दल काय?''

''तुझ्याआधी मी माघार घेईन असं तुला वाटतं? चल, रस्टी, आपण इथून बाहेर पडूं . उद्या शनिवार आहे आणि आपल्याला ती बोट पकडायची आहे.''



# वस्त्रहरण

मी आणि दलजित मालगाडीच्या उघड्या डब्याच्या तळाशी हातपाय पसरून पडलो होतो. गाडी वाळवंटातून हळू हळू मार्ग क्रमत होती आणि गरम वारे आमच्यावर रेती उधळत होते. ती चिकट वाळू आमच्या केसात, डोळ्यात, आणि तोंडात जात होती. त्यापासून सुटका नव्हती. दलजितचा चेहरा वाळूने माखला होता आणि माझ्या चेहऱ्याच्या रंगासारखा झाला होता. सूर्याचे कडक किरण आमच्यावर पडत होते. डब्याच्या एका छोट्याशा कोपऱ्यात तेवढी थोडीशी सावली होती. आमच्याजवळ उरलेल्या पैशातून आम्ही केळी विकत घेतली होती आणि ती मधून मधून चघळून खात होतो.

''आपण अर्धपोटी आहोत असं सकाळी वाटेल,'' मी म्हटले. ''आपण ही केळी उरवायला हवीत.''

'''सकाळ उद्या येणार आहे,'' दलजित म्हणाला. ''मी आज भुकेला आहे. शिवाय सकाळी आपण जामनगरला पोचू.''

''आणि गलबत गेलं असलं म्हणजे?''

''गलबत तिथंच असेल.''

''कशावरून?''

''तसं कशावरून नाही. मी आपला आशावादी आहे.''

''आता ते केव्हाही निघेल; एखादे वेळी ते सुटलेले सुद्धा असेल. दलजित, तिथं आपण पैशाशिवाय आणि एकटे पडू. मग आपण काय करायचं?''

''रस्टी, काळजी करणं सोडून दे पाहू. तू इतका निराश होऊ नकोस. आपण अडचणीत आलो तर घड्याळ विकू आणि शाळेत परत जाऊ आणि मग ते आपल्याला काढून टाकतील. नाही, ते आपल्याला काढून नाही टाकणार. त्यांना माझ्या वडलांकडून मिळणारे पैसे हवेत. तेव्हा तुझी तयारी असेल तर आपण पुन्हा पळून जाऊ.''

"ते गलबत उद्या तिथं असायलाच हवं."

"ते तिथं असेलच. त्याच्यात बसून आपण उद्या निघून जाऊ. थोडेच दिवस का होईना पण तू माझ्या बरोबर मोंबासाला रहा ना."

"तसा वेळ मला काढता येईल की नाही कोण जाणे? बहुधा माझ्या काकांबरोबर प्रवास करण्याच्या घाईतच माझा सारा वेळ जाईल."

"किती गंमत, नाही? यापुढं शाळा बंद. एखादे वेळी मी तुझ्या बरोबर येईन. रस्टी, मला नाही वाटत काम धंद्यात एवढी मौज असेल म्हणून."

"आपल्या दोघांना एकत्र सारं जग पाहायला मिळेल!" मी म्हटले. "आपण किती स्वप्नाळू आहोत, नाही?"

"कुठंतरी का होईना पण आपल्याला आपली वाट दिसू लागली आहे. पंजाबमध्ये तयार झालेले कापड विकण्यासाठी माझे आजोबा जगभर हिंडायचे. ते नेह्मी म्हणायचे की एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्याचे सर्वात चांगले कारण म्हणजे त्या दोहोंच्या मध्ये काय आहे ते पाहणे."

"ते मध्ये कापड विकायचे," मी म्हटले. "ते आपल्याप्रमाणे नुसती स्वप्ने पाहायचे नाहीत."

"रस्टी, तू आता माघार घ्यायचं ठरवलैस का?"

"नाही, मुळीच नाही."

"पण तो रात्रीचा प्रवास खरोखरच फार तापदायक होता. त्रास वाटावा इतकी हळू ती आगगाडी जात होती. आणि खूपच ठिकाणी थांबत होती. एका छोट्याशा स्टेशनात बहुधा जनावरांच्या खाद्याने भरलेली पोतीच्या पोती आमच्याच डब्यात फेकण्यात आली. आम्ही आमच्या अर्धवट झोपेत जवळ जवळ पुरते पुरले जाणार होतो. पण आमच्या लक्षात आले की त्यांच्यावर विश्रांती घेणे फारच सुखकारक आहे. आणि सकाळीच पहिले फटफटू लागेपर्यंत आम्ही त्यांच्यावर आरामात पडून राहिलो.

आकाश अधिकाधिक स्वच्छ होऊ लागले तसे आपला प्रवास संपत आलाय हे आमच्या लक्षात आले. सभोवतालच्या परिसरात पूर्णपणे बदल झाला होता. वाळवंट ओलांडून आता आम्ही समुद्रसपाटीवरून जात होतो.

उंच, हांका मारणारी नारळाची झाडे पांगली, तेव्हा आयुष्यात पहिल्यांदाच मी समुद्र पाहिला.

मी नेह्मी कल्पना करायचो तसाच तो होता-खूप पसरलेला, एकटा आणि निळा. आकाश जेवढे निळे होते तेवढाच तोही होता. आणि मी पहिले जहाज पाहिले ते प्रवासीच होते. एक अरब जहाज. किनाऱ्यापर्यंत वाहणाऱ्या हळू

वाऱ्यामध्ये डचमळणारे. खाली वाहत, वळत जाऊन समुद्राला मिळणाऱ्या एका ओढ्यावर बांधलेल्या छोट्याशा पुलावर गाडी थांबली.

आम्ही इथेच उतरलो आणि आम्हाला गाडीतून न्यायला संमती देणाऱ्या ब्रेक्समनला आम्ही हात हलवून आमचे आभार कळवले. मग आम्ही ओढ्याच्या काठावरून खाली घसरलो आणि गाडी पुन्हा सुटेपर्यंत पुलाच्या खाली लपून बसलो. गार्डने आम्हाला पाहू नये अशी आमची इच्छा होती, कारण आम्हाला गाडीतून न्यायला त्याने काही परवानगी दिली नव्हती. आपण आता एकटेच आहोत असे आम्हाला वाटले तेव्हा आम्ही आमचे मळलेले, प्रवासाच्या खुणा असणारे कपडे काढून ठेवले आणि ओढ्याच्या पाण्यात पाणकमळांच्या वेलींना तुडवत खाली उतरलो. टेकड्यावरून वेगाने वाहणाऱ्या प्रवाहांच्या मानाने इथला प्रवाह अगदी हळू वाहणारा होता आणि इथले गरम पाणी पर्वतांपासच्या पाण्याइतके उत्साहवर्धक नव्हते पण ते आम्हाला हवे तसे ताजे होते आणि आमच्या दमलेल्या शरीरांना ताजेतवाने करणारे होते. आम्ही पाण्यात डुबक्या मारल्या, एकमेकांवर किंवा नुसतेच आजुबाजूला पाणी उडवले. पाण्याखालून पोहण्याचा पराक्रम दलजितने केला. या सगळ्यात तुटलेले एक कमळाचे फूलही वर येताना त्याच्या लांब केसात अडकून आले होते.

आम्ही जवळ जवळ पंधरा मिनिटे पाण्यात होतो आणि आजुबाजूच्या साऱ्या परिसराला विसरलो होतो. आम्ही चढून पुन्हा काठावर आलो तेव्हा आमच्या लक्षात आले की आपले कपडे गायब झाले आहेत. फक्त दलजितचा फेटा तेवढा राहिला होता.

काठाच्या पलीकडे वर फक्त लंगोट नेसलेली तीन मुले उभी होती आणि आमच्याकडे रोखून पाहात होती. त्यांच्यातल्या सर्वात मोठ्या मुलाच्या जवळ आमचे कपडे होते.

"आमचे कपडे आम्हाला देऊन टाका," मोकळेपणाने दलजित हिंदीत म्हणाला. "माझा फेटा इथंच ठेवलात हे चांगलं केलंत, पण मी फेटा फक्त डोक्यालाच बांधतो."

तिन्ही मुले खळखळून हसली आणि पाठीमागे वळली आणि शेतातून निघून जाऊ लागली.

"अरे, परत या," दलजित ओरडला.

"चल, त्यांचा पाठलाग करू," मी म्हटले.

हा आमच्यासाठी जीवनमरणाचा प्रश्न होऊन गेला होता. दलजितच्या अंगात डोक्यावर फेटा आणि हातात घड्याळ एवढाच पोषाख होता. माझ्याजवळ तर तेवढाही नव्हता. आम्ही घाईघाईने काठावर आलो आणि जीव खाऊन पळत त्या

खेडूत मुलांचा पाठलाग करू लागलो. पण ती आमच्यापासून बरीच पुढे होती आणि शेतांतली ती वाटही त्यांच्या पायाखालची होती. ती त्यांच्या गावात शिरली तरी आम्ही आपले शेतातच ठेचकाळत होतो, बांधावरून आणि खड्ड्यांवरून पडत होतो. एका भिंतीआडून आमच्यावर खड्यांचा वर्षाव झाला तेव्हा आम्ही थांबलो.

"आपण त्यांना विनंती करून काही जमतंय का ते पाहू या," मी म्हटले. मी दोन्ही हात तोंडापाशी धरले आणि मला येणाऱ्या चांगल्यातल्या चांगल्या हिंदीत ओरडलो," कृपा करून आमचे कपडे आम्हाला परत द्या. आमच्याकडं तेवढेच आहेत.

प्रत्युत्तर म्हणून एक मोठा धोंडा माझ्या कानाजवळून गेला.

"मला नाही वाटत इथं हिंदी समजतं म्हणून," मी म्हटले. "मी इंग्रजीत बोलू का? मला त्याहून अधिक भाषा येत नाहीत."

"इंग्रजी नाही. त्यामुळं तर अधिकच दगडांचा मारा होईल. मला वाटतं इथं गुजराथी बोलतात आणि मला तर तिच्यातला एक शब्दही येत नाही."

शेताच्या काठावर एक माणूस अवतरला. आमच्या दिशेने काठी उगारत तो न कळणाऱ्या भाषेत काहीतरी ओरडत होता.

"तो काय म्हणतोय ते तुला समजतंय का?" दलजित म्हणाला.

"मला कसं समजणार? बहुधा आपण त्याच्या जमिनीवरून निघून जावं एवढंच त्याचं म्हणणं असावं."

"आपले कपडे मिळाल्याशिवाय आपण जाणार नाही."

"मला वाटतं आपण जाणार आहोत," मी म्हणालो. "ती पहा. आता कुत्री आली."

बास्करव्हिलच्या हाउंड्सप्रमाणे आमच्यावर भुंकत गावातली अनेक कुत्री आमच्या दिशेने उड्या मारत येऊ लागली. त्यांच्या पाठोपाठ काठ्या घेतलेली दोन माणसे आणि हातात दगड घेतलेली अनेक मुले यांचा लवाजमा होता.

मी आणि दलजितने त्यांना आपली पाठ दाखवण्यास वेळ गमावला नाही आणि आमच्या दमलेल्या अवयवांनी जितके शक्य तितक्या लवकर शेतातून मार्ग काढला. तो ओढा ओलांडल्यावरच आम्ही श्वास घेण्यासाठी थबकलो. गावकऱ्यांनी ओढा ओलांडला नाही आणि आम्हाला वाटले की आपण आता दुसऱ्या कोणाच्या तरी हद्दीत आहोत. गावकऱ्यांनी आमच्यावर आपल्या काठ्या उगारून दाखवल्या आणि आम्ही त्यांना आमच्या हाताच्या मुठी उगारून प्रत्युत्तर दिले. पण अजूनही आम्ही आमच्या कपड्याविना होतो. आम्ही तो ओढा सोडला आणि आंब्याच्या राईमध्ये विसावा घेतला. तेथे आम्हाला कोणी त्रास दिला नाही.

"आणि आता आपण काय करायचं?" दलजित म्हणाला.

"जामनगरपर्यंत चालत जायचं," मी म्हणालो. "ते काही फार लांब असणार नाही."

"हे असंच, अंगात काही न घालता?"

"काय हरकत आहे? अंधार पडेपर्यंत आपण वाट पाहू या."

"आणि सकाळ होईल तेव्हा?"

"तोपर्यंत सापडेल आपल्याला काहीतरी. तुझं घड्याळ विकून आपल्याला कपडे घेता येतील."

"फक्त घड्याळ घालून दुकानात शिरायचं आणि नंतर ते तिथं विकायला पाहायचं याची मला कल्पनाही करवत नाही."

"आपण कोठलेतरी साधू आहोत असं भासवता येईल," मी म्हटले. "किंवा त्यांचे खास चेले. तसं दाखवायची हल्ली जोरात टूम आहे. फक्त उत्तम साधूच नागडे फिरतात."

आपल्याला एखादेवेळी फुकट खायला आणि रात्रभर राहायलाही मिळेल.

"आणि सकाळी जहाज आपल्याशिवाय निघून गेले हे आपल्याला कळेल."

"अरे खरंच की. हे मी विसरूनच गेलो होतो...."

तथापि स्वतःच्या अडचणीच्या परिस्थितीबद्दल चर्चा करत आम्ही तिथे बसलो असताना बहुधा आगगाडीचे कामगार असावेत असे वाटणारी दोन माणसे आमच्या बाजूने ओढ्याकडे येताना आम्हाला दिसली. शेतकऱ्यासारखे धोतर न नेसता त्यांनी पँट, शर्ट, आणि बूट घातले होते. सुरवातीला मला वाटले की ते प्रवाहाकडे पाणी न्यायला म्हणून जात आहेत. पण त्यांनी जेव्हा स्वतःचे कपडे उतरवायला सुरवात केली तेव्हा अफलातून कल्पना डोक्यात येऊन मी एकदम बसता झालो.

"दलजित," मी घाईघाईने म्हटले. "तू त्यांना पाहिलंस?"

"अर्थातच मी त्यांना पाहतोय," मला काय म्हणायचेय ते ओळखायला त्याला वेळ लागला नव्हता. "रस्टी, ही आपली शेवटची संधी आहे! आपण दयाबिया मुळीच दाखवता कामा नये. आपल्यासारख्या सभ्य लोकांच हे जग नाहीयै! आपण आपले मार्ग बदलले पाहिजेत आणि इथले लोक वागतात तसंच आपणही वागायला पाहिजे. ते बहुधा गावकऱ्यांवरच आळ घेतील. पण आवाज न करता चल. झुडपांच्या आडच राहा. त्यांनी आपल्याला पाहता कामा नये!"

रांगत, रांगत, उघड्या अंगाला खरचटणाऱ्या काट्यांकडे दुर्लक्ष करत, आम्ही पुन्हा प्रवाहाच्या जवळ आलो. पलीकडेच ती माणसे आंघोळ करत

होती. लहान मुलांप्रमाणे पाण्यात खेळून ती बराच आवाज करत होती. (माझ्या निरिक्षणानुसार उघड्यावर आंघोळ करत असताना मोठी माणसे गमतीशीरपणे वागतात. बहुधा ज्या खेळकर अमीबापासून त्यांचा विकास झाला ती मूलभूत तत्त्वे त्यांच्यात जागृत होत असावीत.) आणि त्यांनी आम्हाला पाहिलेही नाही वा आमचा आवाजही ऐकला नाही. त्यांचे कपडे एकावर एक पडून त्यांचा अघळपघळ ढीग झाला होता आणि तो आमच्यापासून थोड्याश्याच अंतरावरच होता.

"मी ते घेतो," दलजित कुजबुजला. "मी दिसलो तर कोणीतरी खेडेगावातला मुलगा आहे असे त्यांना वाटेल. पण त्यांनी तुला पाहिलं तर मात्र आपली अगदी गच्छतीच!"

झटदिशी, अतिशय वेगाने, तो झुडुपापाठीमागून बाहेर पडला. (हाच वेग त्याने कधी शाळेत दाखवला असता तर तो चांगल्यापैकी क्रीडापटू झाला असता.) त्याने सगळे कपडे हस्तगत केले आणि पटदिशी तो पुन्हा माझ्यापाशी आला.

"कमाल केलीस!" मी कुजबुजलो. "त्यांना काहीसुद्धा पत्ता लागला नाही."

आपले कपडे गेलेत हे त्यांना कळेपर्यंत आम्ही तेथे थबकलो नाही. (खरे सांगायचे तर तसे करावे अशी आम्हाला तीव्र इच्छा होती.) तर आम्ही लागलीच सूं बाल्या करून तेथून आमराईतून पळ सुद्धा काढला.

आम्ही आगगाडीचे रूळ ओलांडले आणि एक जुनी विहीर लागेपर्यंत माळावरून पळालो. तेथे एका मोठ्या वडाच्या सावलीत आम्ही आमचे नवे कपडे चढवले. अर्थातच ते आम्हाला मोठे, कितीतरी ढगळ होत होते.



# जामनगर

दोन तासांनंतर आम्ही जामनगरमधे दाखल झालो. आम्ही एका छोट्याशा चहाच्या दुकानाजवळ थांबलो आणि इतर लोक लाडू आणि भेळपुरी खात आहेत हे पाहिले. आम्ही साधा नारळसुद्धा विकत घेऊ शकत नव्हतो.

"बंदर कुठं आहे ?" मी दुकानदाराला विचारले.

"इथून दोन मैल लांब आहे," दुकानदार उत्तरला.

"तिथं काही बोटी लागल्यात का ?" जरासे बरे वाटत मी विचारले.

"तुम्हाला बोटीशी काय करायचंय ?"

"कोणालाही बोटीशी काय करायचं असतं ?"

"फक्त एकच बोट लागलेली आहे आणि ती आजच सुटणार आहे. ती पकडायची असेल तर तुम्हाला घाई करायला हवी."

"चल, जाऊ या," दलजित म्हणाला.

"थांबा," दुकानाच्या गल्ल्याला रेलून उभा असलेला एक तरूण म्हणाला. "तिथं चालत पोचायला तुम्हाला जवळ जवळ तासभर लागेल. मी तुम्हाला माझ्या "घारी" तून नेतो.

त्याने जवळच उभ्या असलेल्या एका गचाळ टांग्याकडे बोट दाखवले. त्या घोडीची कुठं जायची इच्छा असेल असे तिच्या अवतारावरून तरी वाटत नव्हते.

"माझी घोडी वेगानं धावते," आमच्या नजरा पाहून तो म्हणाला. नुसत्या देखाव्यावरून जाऊ नका. ती दमलेली वाटेल पण ती इतकी वेगानं धावते की जणू चँपिअनच! चला, बसा तुम्ही. मी तुम्हाला एका रुपयात नेतो.

"आमच्याजवळ काहीच पैसे नाहीत," मी म्हटले. "आम्ही चालतच जातो."

"मग फक्त पन्नास पैसे द्या," तो म्हणाला. "पन्नास पैसे आणि पेलाभर चहा. चला, उडी मारा."

''ठीक आहे,'' दलजित म्हणाला. ''वेळ घालवायची ही वेळ नाही. पन्नास पैसे आणि चहा तुमचा तुम्ही विकत घ्यायचा.''

आम्ही घारीत चढलो. तो तरूण उडी मारून पुढे बसला आणि त्याने चाबूक फटकारला. घोडी पुढे चालायला लागली, चाके कुरकरत होती आणि हलत होती, आणि आम्ही कमालीच्या वेगाने बाजारच्या रस्त्याने जात होतो.

''तुझ्याजवळ पन्नास पैसे शिल्लक आहेत हे मला माहिती नव्हतं,'''' मी म्हटले.

''नाहीच आहेत,'' दलजित म्हणाला. ''पण त्याबद्दल आपण नंतर काळजी करू. तुझे काका पैसे देतील.''

आम्ही गावाच्या बाहेर आलो आणि मोकळ्या रस्त्याने समुद्राकडे जाऊ लागलो तेव्हा घोडी अधिकच वेगाने धावू लागली. रस्ताच उताराचा होता त्यामुळे ती तरी दुसरे काय करणार होती म्हणा! वाऱ्याने माझे केस माझ्या डोळ्यांवर आले. हवेत समुद्राची खारसाण भरली होती.

उत्तेजित होत दलजितने मला हलवले.

''आता आलोच आपण बंदरात'' तो म्हणाला. ''आणि मग अखेरीला दूरवर कुठेतरी!''

घारीवान आपल्या घोडीशी कौतुकाने बोलत होता. समुद्राचा वारा आणि त्याच्या घारीचा वाढलेला वेग यामुळे रंगात येऊन तो गाऊ लागला. रस्त्याबरोबर आम्ही एक वळण घेतले आणि आम्ही समुद्रावरच आलो. पहातो तो समोर बंदर. तेथे अनेक छोटी जहाजे किनाऱ्याला लागून उभी होती आणि मासे पकडणाऱ्या होड्या वाळूवर पसरल्या होत्या. कोळी लोक आपली जाळी वाळवत होते आणि त्यांची नागडी मुले किनाऱ्यावर आदळणाऱ्या लाटांच्या फेसातून धावत होती. एक आगबोट पाण्यात उभी होती आणि इतक्या लांबून मला तिचे नाव वाचता येत नव्हते तरी ती 'ल्युसीच' आहे अशी माझी खात्री होती.

धक्क्याच्या तोंडाशी येऊन घारी थांबली. त्याबरोबर पटापट खाली उड्या टाकून आम्ही धक्क्यावरून पळत सुटलो. पण आम्ही पळत असतानाच माझ्या लक्षात आले की ती आगबोट सुटलेली आहे, आमच्यापासून दूर, समुद्रात जात आहे. पाणी कापत जाणाऱ्या तिच्या मागच्या पंख्यामुळे निर्माण झालेल्या छोट्या छोट्या लाटा पाठीमागे धक्क्यावर येऊन आदळत होत्या.

''कप्तान!'' मी ओरडलो. ''जिमकाका! थांबा माझ्याकरता.''

एक लास्कर-भारतीय खलाशी-गलबताच्या मागच्या भागात उभा होता. त्याने आमच्याकडे पाहून हात हलवला. पण तेवढेच. धक्क्याच्या

टोकाशी उभा राहून मी माझे हात हलवत होतो आणि रोरांवत्या वाऱ्यात ओरडत होतो.

"कप्तान जिमकाका! माझ्याकरता थांबा".

कोणीच उत्तर दिले नाही. गलबताच्या मागातून गिरक्या घेत उडणाऱ्या समुद्रपक्ष्यांनी तीच हाकाटी उचलल्यासारखी वाटत होते- "कप्तान, कप्तान..."

गलबत अधिकच पुढे गेले आणि त्यानेही वेग पकडला.

आणि तरीही मी घोगऱ्या आवाजात, विनविण्या सुरात त्याला हाका मारतच राहिलो.

योकोहामा, सॅन दिएगो, वालपराईसो, लंडन... सगळीच कायमची दूर जात होती...

आम्ही दोघेच धक्क्यावर उभे होतो. आता दुपार टळली होती. आणि समुद्रपक्षी आमच्या भोवती घिरट्या मारत होते- त्यांच्या हाकांनी आम्हाला जणू खिजवत होते. जिमकाकांच्या एका पत्रातले शब्द माझ्या डोक्यात भिरभिरले. "पहिल्यांदा एडनला जायचं, मग सुवेझ आणि मग वर कालव्यामधून जायचं..." पण माझ्याकरता आता फक्त लांबचा परत प्रवास, माझ्या पालकांचा राग, कंटाळवाण्या शाळेतला वर्ग. दलजित गप्पच होता. सरतेशेवटी त्याच्याकडे पहायचंच असं ठरवून मी वळलो तेव्हा त्याच्या चेहऱ्यावर हास्य पाहून मला नवल वाटलं. त्याचा चेहरा मुळीसुद्धा पडलेला नव्हता.

"आपल्याला यायला उशीर झाला," तो म्हणाला. "आपण शेकडो मैलांचा प्रवास केला पण अखेरीला पाच मिनिटं उशिराच पोचलो."

"जाऊ दे. इतकं आपण केलं पण ते सगळं वाया गेलं. आपले सगळे बेत..."

"आपण पाहिलेली सारी स्वप्नं!"

"स्वप्नं पाहायला काय हरकत आहे?"

"काहीच नाही. ती जोपर्यंत खरी ठरत नाहीत तोपर्यंत आपल्याला ती पाहात राहता येतात. आपण शाळेत परत जाऊ आणि निराळी स्वप्नं पाहू."

"दलजित, तू एवढा तत्त्ववेत्ता आहेस हे मला माहिती नव्हतं. आणि आपण शाळेत परत जाऊ शकूं असं तुला वाटतं? तू तुझं घड्याळ विकलंस तरीही तेवढे पैसे आपल्याला पुरेसे ठरणार नाहीत. मला सगळ्याचा कंटाळा आलाय. मला कुठंही जायचं नाही. माझे काका परत येईपर्यंत मला इथं धक्क्यावरच बसून राह्यचंय."

"तुला किती वेळ वाट पाहावी लागेल?"

"एक किंवा दोन वर्षं," मी हसत म्हटले.

"परत जाण्याबद्दल तू काळजी करू नकोस," दलजित म्हणाला.

"आपण पळून जायचं हे ठरविलं तेव्हा ते एक गुपित होतं. पण आता त्यात गुसता वगैरे काही शिल्लक नाही. आपण घड्याळ विकू, घारीवाल्याचे पैसे देऊ आणि तार करू."

"मुख्याध्यापकांना?"

"नाही. मुंबईत राहणाऱ्या माझ्या काकांना. ते त्यांच्या मोटारीनं इथं येतील आणि आपल्याला मोटारीतून घेऊन जातील. यावेळी आपण अगदी आरामात प्रवास करू! कोंबडी आणि आइसक्रीम संबंध प्रवासभर खाऊ! काही दिवस आपण अगदी चंगळ करू या."

"होय," मी म्हणालो. "आपण परत गेलो म्हणजे चंगळ करण्याजोगं आपल्या जवळ काहीच नसेल."

आम्ही घारीकडे चालत जाऊ लागलो तेव्हा मी फारसे काही बोललो नाही. माझे मन कुठेतरी दूरदूर होते. मी स्वत:ला आठवण करून देत होतो की पुढच्या वर्षी, केव्हातरी जिमकाका 'ल्युसी' बरोबर परत येतील आणि त्यावेळी मी पुन्हा चूक करणार नाही. ते गलबत सुटण्याअगोदर कितीतरी वेळ आधीपासून मी त्याच्यावर चढलेला असेन.

आणि म्हणून मी थांबलो. आणि समुद्राकडे अखेरचे रोखून पाहिले. त्या एवढ्या विस्तीर्ण समुद्रामधे ती आगबोट अगदी छोटीशी दिसत होती.

या वर्षी, पुढच्या वर्षी, केव्हा तरी... योकोहामा, वालपराइसो, सॅन दिएगो, लंडन...



Lasertypeset at : Lasertech, Zamrudpur, New Delhi-110048 and printed at Beauty Prints. Paharganj, New Delhi-110055